


नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५७ । अंक ३ । **डिसेंबर २००२**
कार्तिक-मार्गशीर्ष, शके १९२४
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-



---

## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.





**संपादकीय पत्रव्यवहार :**
कार्यकारी संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)









अनुक्रमणिका

# नवभारत

डिसेंबर २००२

प्रकाशन : मे २००३

## अ नु क्र म




मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन







# जागतिकीकरण आणि भारतीय समाजासमोरील यक्ष प्रश्न

वसंत पळशीकर

बंधू-भगिनींनो,

विचारवेध संमेलन हा डॉ. बाबासाहेब आंबडकर अकादमी (सातारा) या संस्थेने प्रवर्तित केलेला अभिनव उपक्रम आहे. समाजपरिवर्तनामध्ये रस असणाऱ्यांनी व कार्यकर्त्यांनी वर्षातून एकदा एकत्र जमून निवडक विषयांवर विचारविनिमय करावा यासाठीचे हे व्यासपीठ.

यातली अभिवनता, आगळेवेगळेपण याबद्दलच आरंभी मला आपणा सर्वांशी संवाद करावयाचा आहे. इष्ट दिशेने, उच्च नैतिक-ऐहिक ध्येये साकार करण्याच्या दिशेने समाजाचे परिवर्तन घडवून आणण्यासाठी प्रस्थान ठेवलेल्या कार्यकर्त्यांनी नित्यनेमाने आपल्या विचारांची पुनःपुन्हा स्पष्टता करून घेण्याची निकड असते, यासाठी त्यांनी सवड काढण्याची गरज असते, या मान्यतेवर विचारवेध संमेलनाचा उपक्रम उभारलेला आहे. सामान्यतः एका विशिष्ट विचारव्यूहप्रणालीला (आयडियॉलॉजी) निःशंक बांधिलकी असणे पुरेसे मानले जाते. फेरविचार करावयाचाच झाला तर तो, मुख्यत्वेकरून, रणनीती व डावपेच यांचा, तंत्र व पद्धती यांचा, लढे-आंदोलने, कार्यक्रम यांचा, अशी धारणा आढळते. येथे विचारांचाच नियमितपणे व सातत्याने 'वेध' घेण्याची आवश्यकता गृहीत धरलेली आहे. एक आगळेवेगळेपण हे आहे.

खुलेपणाने, सामूहिकतेने व सहभागाच्या द्वारे विचार करण्याची भूमिका अभिनव आहे. वैचारिक चर्चा, वादसभा, परिसंवाद, कार्यशाळा या गोष्टी नवीन नाहीत. प्राचीन काळापासून त्या अस्तित्वात आहेत. निवडक विद्वत्जनांनी आपापसांत चालवावयाच्या या गोष्टी होत अशी समजूत होती व आजही आहे. तज्ज्ञ, अभ्यासक, संशोधक, विचारवंत अशांनी एकत्र येऊन विचारविनिमय करण्यावर भर असतो. अभिजन-सामान्यजन असा भेद गृहीतच धरलेला असतो. जनाधारित पक्ष व संघटना यांची गोष्ट जरी घेतली तरी जवळपास सर्वच परिषदा, मेळावे, अधिवेशने यांच्यामध्ये मंचावरील अभिजन व्यक्ते आणि समोर बसलेले सामान्य बहुजन श्रोते अशी विभागणी असते. सामान्य कार्यकर्ते वा सभासद यांची भूमिका ऐकून घेण्याची, नम्रपणे ग्रहण करण्याची, बोध आत्मसात करण्याची असते. फार तर खुलासा करून घेण्यासाठी काही शंका, प्रश्न उपस्थित करण्यास मुभा असते. तज्ज्ञांनी, विचारवंतांनी, पुढाऱ्यांनी, ज्येष्ठांनी मार्गदर्शन करावयाचे असते. हा परिचित घाट आहे. विचारवेध संमेलनाचे वेगळेपण यात आहे की, हे गावोगावच्या सामान्य कार्यकर्त्यांचे, सहभागामधून विचार करण्यासाठीचे संमेलन आहे. ही मूळ कल्पना. आपापल्या ठिकाणी, विभिन्न स्थानिक परिस्थितीमध्ये व पर्यावरणामध्ये परिवर्तनाचे कार्य करण्यात गढलेल्या लहान-मोठ्या कार्यकर्त्यांना नाना अनुभव येत असतात; पेचात, कोंडीत सापडल्यासारखे होते; अपयशाचे धनी व्हावे लागते. आपल्या विचारव्यूहप्रणालीच्या चिरेबंद बांधणीचा अपुरेपणा ध्यानात येतो. त्यावर फेरविचार करायला हवा असे मुद्दे समोर येतात. काही वेळा समाजात कार्यरत असलेल्या अन्य वैचारिक व भौतिक शक्तींनी, घडामोडींनी धक्के बसतात, गोंधळून जायला होते. काही वेळा अनपेक्षितपणे सुखद अनुभव येतात, यश पदरात पडते. काही नवे गवसते-सुचते. विचारवेध संमेलनाच्या कल्पनेच्या मूळाशी पक्केपणाने, निःसंदेहपणे स्वीकारलेले एक गृहीत तत्त्व (axiom) असे की, सामान्य गणल्या जाणाऱ्या प्रत्येक कार्यकर्त्याच्या/व्यक्तीच्या ठायी एक दडलेला, सुप्त विचारवंत आहे. स्वतःच्या कडूगोड अनुभवांचे तटस्थ वृत्तीने, चोख विश्लेषण करून त्या अनुभवांना सामोरे जाण्याची क्षमता प्रत्येकाच्या ठायी असतेच असते. विचारवेध संमेलनाच्या कल्पनेच्या मुळाशी आणखी एक असेच गृहीततत्व आहे. एकेकट्याने त्याच्या त्याच्या जागी सखोल चिंतन-मननाची प्रक्रिया चालवावी हे गरजेचे, इष्ट व आवश्यकही आहेच. पण आपापले अनुभव, निरीक्षणे, विचार घेऊन जर

---

* वर्धा येथे २०-२२ डिसेंबर २००२ या काळात डॉ. बाबासाहेब आंबेडकर अकादमी, सातारा, प्रणीत (आणि यशवंतराव दाते स्मृति संस्था, वर्धा यांच्यातर्फे आयोजित) दहाव्या विचारवेध संमेलनातील अध्यक्षीय भाषणाची (दुरूस्त) संहिता.

अनुक्रमणिका

अनेक जण एकत्र आले आणि तटस्थ वृत्तीने म्हणजेच वैज्ञानिकाच्या सत्यशोधक वृत्तीने, परस्परांजवळच्या अनुभव, निरीक्षणे, विचार यांच्या मनमोकळ्या आदान-प्रदानांच्या आधारे अध्ययन, चिकित्सा व चिंतन यांची सर्वसहभागी प्रक्रिया चालवली तर विचार अधिक समग्र, सखोल, अर्थपूर्ण, जिवंत व प्रस्तुत होतो, हे ते गृहीततत्त्व आहे. ही प्रक्रिया जर योग्य प्रकारे आपण चालविली तर आत्मबल वाढते, आत्मविश्वास उत्पन्न होतो व कृतिप्रवण उर्जा पण उत्पन्न होते.

विचारवेध संमलने महाराष्ट्रातल्या वेगवेगळ्या लहानमोठ्या शहरांमधून झालेली आहेत. त्या त्या गावातील परिवर्तनाच्या विचारांशी व चळवळी-संघटना यांच्याशी, कामांशी जोडलेली दोनतीनशे मंडळी संमेलनात मनःपूर्वक हजेरी लावतात अर्थ असा की, वैचारिक आशय असलेली संवाद चर्चा ऐकण्याची जिज्ञासा असलेली, भूक असलेली आस्थेवाईक मंडळी, उमेद वाढावी एवढ्या संख्येने, महाराष्ट्रभर गावोगावी आहेत.

अशा वैशिष्ट्यपूर्ण, महत्त्वपूर्ण संमेलनाचे अध्यक्षपद मला देऊन आंबेडकर अकादमीने माझ्या खांद्यावर मोठी जबाबदारी टाकली आहे. हा बहुमान आहे याचे भान मला आहे. संयोजकांचा मी ऋणी आहे. ऋणी यासाठी की परिवर्तनाच्या चळवळीशी सक्रियपणे जोडून घेतलेल्या आपल्यासारख्या जागरूक व आस्थेवाईक मंडळींशी संवाद करण्याची अमोल संधी संयोजकांनी मला दिली आहे.

विचारवेध संमेलन हे पुरोगामी, इहवादी, विज्ञानवादी, डाव्या परिवर्तनवादी चळवळींमधल्या व त्या विचारांच्या मंडळींचे व्यासपीठ, ही त्याची ओळख आहे, अस्मिता आहे असे म्हणणे वावगे ठरू नये. प्रकर्षाने समतावादी आणि म्हणून स्वाभाविकपणे चातुर्वर्ण्यविचार व जातिव्यवस्था यांच्या उच्छेदाविषयी आग्रही मत बाळगणारी, स्त्री-पुरुष समानता प्रतिपादणारी मंडळी या व्यासपीठावर एकत्र आलेली आहेत. महात्मा जोतिबा फुले आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना सर्वाधिक मानणारी, त्यांचा वारसा पुढे नेऊ पहाणारी बहुसंख्य मंडळी ही डाव्या विचारांची म्हणता येत असली तरी, अनेक निष्ठावंत मार्क्सवादी व कम्युनिस्ट, तसेच कडवे फुले-आंबेडकरवादी विचारवेध संमेलन हे त्यांचे व्यासपीठ मानीत नाहीत असे आढळते. विचारवेधवाले स्वतःची ओळख काहीही देवोत, ते ब्राह्मणी व्यासपीठच आहे, अशीही अनेकांची धारणा असावी असा ग्रह होतो. या अंगाने, विचारवेध संमेलनाची अस्मिता कोणती याविषयी मतमतांतरे आढळतील. परंपरा आणि आधुनिकता यांच्यापैकी आधुनिकतेचा पुरस्कार करणारी, व्यक्तिस्वातंत्र्य आणि लोकशाही/आर्थिक समता व सामाजिक न्याय यांवर भर देणारी, स्त्री-पुरुष उच्चनीचता, जातपात व स्पृश्यास्पृश्यता यांचा ठामपणे अव्हेर करणारी, फुले-आंबेडकर यांचा वारसा प्रामाणिकपणे पुढे चालवू म्हणणारी, अशी स्वतःची अस्मिता विचारवेध संमेलनाने बाळगलेली आहे असे म्हणता येते. महाराष्ट्रात लोकशाही समाजवादी चळवळीशी या व्यासपीठाचे तसे जवळिकीचे नाते आहे. त्याच वेळी, काही महत्त्वाचे अंतरही आहे. महाराष्ट्रातील लोकशाही समाजवादी चळवळ मार्क्सवादाला मान्यता देत असतानाच्या काळातही भारतातील साम्यवादी चळवळीच्यापासून चार हात लांबच राहिली, आणि, दुसऱ्या बाजूला, ती महात्मा फुले आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यापासूनही अंतर राखून होती. राष्ट्रसभेच्या (काँग्रेसच्या) नेतृत्वाखालील स्वातंत्र्यलढ्याच्या मुख्य प्रवाहाचा आरंभापासून शेवटपर्यंत ती एक भाग राहिली आणि महात्मा गांधींच्या वैयक्तिक व वैचारिक प्रभावाखालीही राहिली, असे याचे स्पष्टीकरण देता येईल. आज बदललेल्या परिस्थितीत व वातावरणात काँग्रेसच्या विभिन्न धारांपैकी कोणत्याच धारेशी वैचारिक वा व्यावहारिक जवळीक विचारवेध संमेलनाची नाही. महात्मा गांधींविषयी खोल आदरभाव असला तरी त्यांचे स्वतःला हिंदू म्हणविणे, वर्णाश्रमधर्माचा पुरस्कार, जातिव्यवस्थेची (काही काळ तरी) त्यांनी केलेली भलावण, त्यांची आध्यात्मिक परिभाषा व ईश्वरभक्ती, त्यांचे खेड्यांना केंद्रस्थानी ठेवणारे आर्थिक-राजकीय विचार इत्यादींमुळे त्यांचा संपूर्ण स्वीकार या व्यासपीठा-वरून करण्यास अडचण वाटल्यास ती गोष्ट समजू शकते; महात्मा फुले व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना विचारवेध संमेलनाच्या व्यासपीठाची तुलनेने अधिक मनःपूर्वक मान्यता आहे.

अर्थशास्त्रासाठीच्या नोबेल पारितोषिकाचे मानकरी अमर्त्य सेन यांनी काही वर्षांपूर्वी 'अस्मिता' (Identity) या विषयावर उद्‌बोधक मांडणी केली. 'अस्मिता' ही एक सामाजिक गोष्ट आहे; माणसाला व समूहांना ती समुदायापासून प्राप्त होते या अर्थाने अस्मिता ही समुदायनिष्ठ असते. या प्रतिपादनातला तथ्यांश स्वीकारून आपल्या पूर्वापार चालत आलेल्या अस्मितेचे विवेकाच्या आधारे सतत परीक्षण व परिष्करण करण्याचे महत्त्व अमर्त्य सेन यांनी ठसविले आहे.

विचारवेध संमेलन हे परिवर्तनवादी मंडळींचे — तेही प्रत्यक्ष कामातल्या मंडळींचे — व्यासपीठ आहे. जे परिवर्तन घडवून आणावयाचा आपणा सर्वांचा संकल्प आहे त्याची स्थूल रूपरेखा आपल्या परिचयाची आहे. स्वातंत्र्य, समता, विवेक आणि आर्थिक-सामाजिक न्याय ही आधारभूत मूल्ये व तत्त्वे आपण निवडलेली आहेत. ही मूल्ये व तत्त्वे टाकून द्यावयाची गोष्ट नाही. आपल्याला ती सम्यक स्वरूपात समजली आहेत का ते वारंवार तपासून पहावयाचे असते. त्यांची, पुनःपुन्हा, नव्याने उकल करून घ्यायची असते. स्थलकालपरिस्थितीचे संदर्भ बदललेले असतात. त्यांच्या पार्श्वभूमीवर मूल्ये व तत्त्वे यांचे अर्थ पुनःपुन्हा लावावयाचे असतात. दरम्यानच्या काळात अनुभव, निरीक्षण, चिंतन गोळा झालेले असते त्यांचा या कामी उपयोग होतो.

तर, मुद्दा असा की, माणसाला प्राप्त झालेल्या विवेक नावाच्या शक्ती/क्षमता या अद्‌भुत गोष्टीच्या सहाय्याने आपली मूल्यनिष्ठा व ध्येयनिष्ठा यांची कालच्यापेक्षा आज अधिक अर्थपूर्ण, प्रस्तुत व परिणामकारक स्पष्टता करून घ्यायची या अर्थाने अस्मिता परिवर्तनशील, लवचिक, गतिमान व वर्धिष्णू राखावयाची हे अमर्त्य सेन यांचे म्हणणे स्वीकारणे आपल्या सर्वांच्या उपयोगी पडणारच आहे. याची आपल्याला विशेष गरज पण आहे.

**'जागतिकीकरण' — 'उदारीकरण'**

आपल्या समविचारी गोतावळ्यांमध्ये अलीकडे काही वर्षे 'जागतिकीकरण' आणि 'उदारीकरण' (Globalisation आणि Liberalisation) या दोन घडामोडींसंबंधी सतत बोलले-लिहिले जात आहे. साम्राज्यवादाच्या युगापेक्षाही हे नवे आक्रमण जास्त विध्वंसक आहे, या आक्रमणाची सूत्रे सधन, बलिष्ठ पश्चिमी राष्ट्रे, जगड्व्याळ बहुराष्ट्रीय कंपन्या (MNC), आंतरराष्ट्रीय नाणे निधी, विश्व बँक यासारख्या आंतरराष्ट्रीय यंत्रणा यांच्या हातात आहेत; आणि तिसऱ्या जगातल्या राष्ट्रांना व लोकांना पुरते पिळून काढावयाचेच हे षड्यंत्र आहे असे आपण उच्चरवाने सतत सांगत आहोत. तिसऱ्या जगातील भांडवलदार, व्यापारी, उच्चपदस्थ राजकारणी व नोकरशहा यांच्या एका अत्यल्पसंख्यवर्गाच्या संगनमताने हे सर्व पार पाडले जात आहे; साम्यवादी सोविएत रशिया ही प्रतिस्पर्धी विरोधी महासत्ता कोसळल्यापासून आणि पूर्वीची साम्यवादी राष्ट्रेही बाजारनिष्ठ समाजवादाच्या (Market Socialism) मोहात सापडल्यापासून पश्चिमी 'विकसित' सधन भांडवली अर्थव्यवस्था जगावर राज्य करू मागत आहेत; अमेरिका ही पुढारी असून 'दुनिया झुकती है, झुकानेवाला चाहिये' ही म्हण अमेरिका खरी करून दाखवायला तत्पर आहे; राजकारण व अर्थकारण या दोन्ही क्षेत्रांमध्ये 'हम करे सो कायदा' अशी अमेरिकेची उन्मत्त दादागिरी चालली आहे, अशी टीका केली जात आहे. हे सारे षड्यंत्र कसे आहे याचे पर्दाफाश करून चित्रण करणारी अनेक पुस्तके, निबंध, लेख 'पहिल्या जगा'तील अनेक मंडळी लिहित आली आहेत आणि यातले काही ना काही आपणा सर्वांपर्यंत पोचलेलेही आहे.

वास्तव काय आहे याकडे वळण्याआधी दोन-तीन गोष्टींची आठवण करून देणे गैर होणार नाही. नाशिक येथे भरलेल्या (१९९६) चौथ्या विचारवेध संमेलनाचा विषय 'भारतीय अर्थकारणाच्या वदलत्या दिशा' असा होता. प्रा. राम बापट अध्यक्षस्थानी होते. भारतीय अर्थव्यवस्थेला नवसंजीवन व जोम प्राप्त करून घेण्यासाठी संधी प्राप्त करून देणाऱ्या या 'बदलत्या दिशा' आहेत, म्हणून आपण त्यांचे स्वागत केले पाहिजे आणि संधींचा पुरेपूर फायदा उठवला पाहिजे, असे मत असलेल्या मंडळींचा या अधिवेशनामध्ये भरीव व लक्षणीय सहभाग होता. या बदलत्या दिशांच्या विषयी व्यक्तिशः मी उत्साही नाही. वा बदलांचा समर्थकही नाही. पण बदलांना विरोध करणारी मंडळी नाशिकच्या संमेलनात युक्तिवादात फार दुबळी ठरली कारण ठराविक साच्यातले युक्तिवाद ती पुनःपुन्हा करीत राहिली. या अनुभवापासून बोध घेणे जरूरीचे आहे. एक, आपला जो प्रतिपक्ष असेल त्याची समर्थात समर्थ मांडणी पूर्वपक्ष म्हणून आपण प्रथमतः करून मग उत्तरपक्ष केला पाहिजे. न्याय व समता ही मूल्ये आपण मानीत असलो तर आपण होऊनच हे पथ्य काटेकोरपणे सांभाळले पाहिजे.

दुसरी गोष्ट अशी की, सोविएत रशिया ही जागतिक राजकारणात अमेरिका व दोस्त राष्ट्रे यांना शह देऊ शकणारी महासत्ता होती (तिच्याजवळची अण्वस्त्रसज्ज क्षेपणास्त्रे, पाणबुड्या इ. मुळे) तेव्हाही आर्थिक व्यवहारांच्या क्षेत्रात जागतिक भांडवली अर्थव्यवस्था अनेक पटींनी जास्त ताकदवान होती. जगातल्या साम्यवादी राष्ट्रांना अनुकूल, स्वागतशील असणाऱ्या अलिप्त (non-aligned) राष्ट्रांच्यासह एक शोषणमुक्त, समता व न्याय यांवर आधारित जागतिक अर्थव्यवस्था

उभारण्याच्या कामी सोविएत रशियाने पुढाकार तर घेतलाच नाही उलट वेगवेगळ्या युक्त्याप्रयुक्त्या योजून, दबाव आणून (arms twisting) अगदी साम्यवादी राष्ट्रांचेही वसाहतवादी शोषणच केले, त्यांच्यामध्ये राजकीय हस्तक्षेपही केला. चीन व रशिया यांच्यात बेबनाव होण्याचे हे एक मुख्य कारण होते.

तिसरी गोष्ट अशी की, मार्क्सचीच परिभाषा वापरावयाची तर, उत्पादनशक्तींनी (forces of production) जो नवा टप्पा गाठला आहे त्यांचे पूर्ण फळ (उत्पादन व सेवा यांच्या रूपात) पदरात पडण्याच्या दृष्टीने राष्ट्र-राज्यांची संरचना अडचणीची ठरत आहे. या शक्ती, ऐतिहासिक अनिवार्यतेने, जगड्व्याळ बहुराष्ट्रीय कंपन्या, भांडवलाची मुक्त व सर्वसंचारी बाजारपेठ, संगणकीय माहितीव्यवस्थापनतंत्र वगैरे वगैरेची निर्मिती करीत आहेत, सोयीचे आहे तेथे राष्ट्र-राज्याची चौकट वापरीत आहेत आणि फायद्याचे आहे तेथे या चौकटीची मोडतोड करीत आहेत. उत्पादनसंबंधही बदलत आहेतच. मार्क्सचा भरवसा नव्या औद्योगिक कामगारवर्गाच्या नैतिक संवेदनशीलतेवर व प्रेरणांवर आणि जागतिक पातळीवरील एकजूट व संघटन (Workers of the World Unite) यांवर होता. पण साम्राज्यवादी सधन, विकसित राज्यसत्ता आणि त्यांच्याशी हातमिळवणी करून प्रबळ होत राहिलेला भांडवलदार, व्यापारी, उद्योजक वर्ग यांच्या हातात निर्णायक राजकीय-आर्थिक सत्ता राहिल्याने आणि बुद्धिजीवी मध्यमवर्गाने आणि कुशल कामगार वर्गाने यांचीच साथ केल्याने उत्पादनशक्तींवर नियंत्रण हे याच शक्तींचे राहिले असून त्यांनी आपल्या लाभाचे नवे उत्पादनसंबंध (relations of production) प्रस्थापित केले आहेत.

स्वतःचे मर्यादित असे आर्थिक व अन्य हितसंबंध साधण्यासाठी नवा औद्योगिक कामगार वर्ग (आणि पुढे पांढरपेशा व्यावसायिक वर्गही) ट्रेड युनियनच्या स्वरूपात संघटित झाला, आणि आर्थिक लाभांविषयीच्या संकुचित वृत्तिचाच तो सुखाने अंकित राहिला (Economism). जशी त्याची आर्थिक स्थिती सुधारली व तो प्रतिष्ठित झाला तशी स्वार्थी हितसंबंधांची जपणूक व संवर्धन करण्याविषयीच तो जागरूक व आग्रही बनला. समता व न्याय यांचा आशय मग अतिशय संकुचित बनला. याचा आपण जगभर आणि भारतातही अनुभव घेत आहोत.

आता आपण परत 'जागतिकीकरण' व 'उदारीकरण' या घडामोडींकडे वळू या. सर्व जगभर खुली, निर्बंधरहित जागतिक अर्थव्यवस्था ठोस स्वरूपात प्रस्थापित करणे हा या 'जागतिकीकरण' – 'उदारीकरण' यामागील प्रवर्तक शक्तींचा घोषित उद्देश आहे. प्रत्यक्षात या प्रवर्तक शक्तींमध्ये बडी सधन राष्ट्रे मोक्याच्या जागी प्रस्थापित आहेत व ती त्यांच्या त्यांच्या स्वार्थी हितसंबंधांची जपणूक करण्यासाठी पक्षपाती वर्तन करीत आहेत. त्यांच्या ठायी खऱ्या अर्थाने समदृष्टी व न्यायबुद्धी नाही. माणसाचे इहलौकिक व्यवहार स्वार्थमूलक असतात, सुख व्हावे व दुःख टळावे यासाठी त्याची अखंड धडपड असते, तसेच इतरांवर आपली सत्ता प्रस्थापित व्हावी, आपण सत्ता गाजवावी ही त्याची एक मूलप्रेरणा असते ही मानवी स्वभावप्रकृतिविषयीची खास आधुनिक समज आहे. ती विज्ञाननिष्ठ आहे अशीही धारणा आहे. मानवस्वभावप्रकृतिविषयीच्या या 'वैज्ञानिक' धारणेशी संवादी असा नीतीविचार (Ethics) आधुनिक काळात विकसित केला गेला. ही चौकट एकदा नीट ध्यानात घेतली तर 'जागतिकीकरण' — 'उदारीकरण' ही घडामोड जे बलवान आहेत ते स्वतःची सत्ता व मत्ता वाढविण्यासाठी चालविणार हे स्पष्ट होते. जे दुबळे आहेत, परावलंबी आहेत, त्यांना त्यांच्या दुबळेपणाची व परावलंबनाची किंमत चुकती करावी लागणे हा या व्यवहाराचा भागच आहे.

एकोणिसाव्या शतकामध्ये नव्या कारखानदारीतल्या दुबळ्या, परावलंबी कामगारांनी जो मार्ग अवलंबिला तो येथेही उपयोगी पडेल. दुबळ्या व परावलंबी लोकांनी/राष्ट्रांनी एकत्र येऊन आपल्या हितसंबंधांच्या रक्षण, संवर्धन व पूर्ततेसाठी संघटित व्हायचे, स्वतःची ताकद उत्पन्न करावयाची व दबाव उत्पन्न करून स्वतःचे हक्क मान्य करवून घ्यायचे, लाभ पदरात पाडून घ्यायचे. भांडवली अर्थव्यवस्था न-नैतिक नाही. लोकशाही राजकीय विचारांची बैठक तिला आहे. तिला एक सार्विक (universal) तत्त्वज्ञानात्मक व नीतीविचारात्मक अधिष्ठान आहे. सारी आधुनिक सामाजिक शास्त्रे ही आधुनिक अर्थशास्त्राची सहोदर असलेली शास्त्रे आहेत. याचा लाभ १९व्या व २०व्या शतकात कामगार संघटनांना व कामगार वर्गास झाला. दुबळ्या, परावलंबी लोकांना, राष्ट्र-राज्यांना कामगारवर्गाने अवलंबलेल्या राजनीतीचा व डावपेचांचा अवलंब करता येईल व एका मर्यादेपर्यंत तरी स्वतःचे हितसंबंध साधता येतील. या नीतीचा अवलंब गॅट करारासंदर्भातील वाटाघाटींच्या काळात व वर्ल्ड ट्रेड ऑर्गनायझेशनच्या परिषदेमध्ये केला जात असल्याचे आपण पहात आहोत.

मुद्दा असा आहे की, आर्थिक आखाड्यात सत्ता, मत्ता, लाभ यांचा हा जो खेळ चालू आहे त्याची सर्वमान्य लक्ष्ये






आहेत आणि खेळाचे नियम पण ठरलेले व औपचारिकतः सर्वमान्य आहेत. खेळाचे नियम औपचारिक सर्वसंमतीने ठरविले जातात व ते बदलूनही घेता येतात. त्याच्या रीतीही ठरविलेल्या आहेत.

आणखीही एक मुद्दा आहे. 'उदारीकरण' या शब्दातला 'उदार' हा मराठी शब्द इंग्रजी 'लिबरल' साठी योजलेला आहे. लिबरॅलिझम हे एक उन्नत राजकीय तत्त्वज्ञान पश्चिमेत आधुनिक काळात विकसित केले गेले. व्यक्तिस्वातंत्र्य, व्यक्तीव्यक्तींमध्ये समता, व्यक्तीचे मूलभूत अविच्छेद्य हक्क, जीवित, स्वतंत्रता व सुख (Life, Liberty and Happiness) यांवरील सर्व व्यक्तींचा समान अविच्छेद्य अधिकार, राज्यसत्तेच्या निरंकुशतेचा अव्हेर, तिच्यावर अंकुश ठेवण्याच्या दृष्टीने व निर्णयप्रक्रिया सार्वभौम, स्वतंत्र व समान व्यक्तींच्या हाती रहावी या दृष्टीने प्रातिनिधिक जबाबदार राज्यपद्धतीचा आग्रह, कायद्यासमोर सर्व समान हे तत्त्व व 'कायद्याचे राज्य' ही संकल्पना हे लिबरॅलिझम या विचारव्यूहप्रणालीचे महत्त्वाचे घटक आहेत. आजच्या 'जागतिकीकरण, उदारीकरणा'च्या प्रवर्तक शक्ती हे घटक स्वीकारतात.

त्याचवेळी, लिबरल विचारप्रणालीचा उत्कर्ष आणि ब्रिटिश साम्राज्याचा जगभर प्रकर्ष एकाच काळात व एकाच समाजात झाला हे पण वास्तव आहे. या विषयावरील उदय मेहता यांचा *लिबरॅलिझम अँड एम्पायर* हा ग्रंथ अवश्य अभ्यासण्याजोगा आहे.

तेव्हा, 'जागतिकीकरण' — 'उदारीकरण' ज्या लिबरल चौकटीत व्यवहारात उतरविले जात आहे त्या चौकटीचाच उपयोग करून, ट्रेड युनियनच्या पद्धतीने संघटित होऊन, (दुबळेपण-परावलंबित्व कायम असतानाही) लाभ-हानी यांच्या संदर्भात एक वेगळा, अधिक न्याय्य असा तोल प्रस्थापित करून घेण्यास अवसर आहे. हे ओळखणे, त्याचे महत्त्व जाणणे आणि या अवकाशाचा जास्तीत जास्त कुशलतेने उपयोग करून घेणे महत्त्वाचे ठरते.

'जागतिकीकरण' — 'उदारीकरण' यांचे टोकाला जाऊन खंडन करणारी, लढाऊ पवित्रे व भाषा वापरीत स्थानिक व जागतिक पातळीवर कृती करणारी काही मंडळी 'जागतिकीकरण' — 'उदारीकरणा'च्या चौकटीत उपलब्ध असलेल्या अवकाशाचा वापर करून अधिक स्वीकारार्ह तोल प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करीत आहेत. तर, इतर काही मंडळी, बलिष्ठ महासत्तांच्या कंपूत प्रवेश करून घेण्याच्या संधी भारताला उपलब्ध झाल्या आहेत, 'नवीन धोरणे' जर हुशारीने निर्धारपूर्वक राबविली तर आपण मुसंडी मारून सत्तावानांच्या अंतर्वर्तुळात घुसू शकू असे आत्मविश्वासाने प्रतिपादन करीत आहेत. या नव्या टप्प्यावरील जागतिक अर्थव्यवस्थेशी समायोजन साधण्यासाठी संरचनात्मक फेरमांडणी करणे जरूरीचे आहे; नियम बदलले पाहिजेत, निर्बंध हटविले पाहिजेत; या सगळ्याची किंमत मोजावी लागणारच, पण ती देऊनच आपण सत्तावान अर्थव्यवस्थांच्या व समूहांच्या पंक्तीत जाऊन बसू शकतो; आणि तोच एक रस्ता बाहेर पडण्यासाठी आहे, एरवी आपण आणखी दुबळे व परावलंबी बनून कायमचे शोषित-पीडित जिणे जगू, असे या मंडळींचे प्रतिपादन आहे.

वास्तव काय आहे? 'जागतिकीकरण' — 'उदारीकरणा'चा रेटा ज्या नव्या टप्प्यावरील जागतिक अर्थकारणामधून उत्पन्न झाला आहे – उत्पन्न केला गेला आहे असेही म्हणू या – तो उलटवून टाकता येण्याइतकी ताकद, त्याचा अव्हेर करणाऱ्यांपाशी भारतातही नाही आणि जागतिक पातळीवरही नाही. कामगारवर्गीय संघटना, चळवळी ह्यांचे विभिन्न प्रकारचे लढे यांमधून पूर्वी भांडवली अर्थव्यवस्थेवर काही अंकुश लागला, ती अधिक लवचिक, गतिमान, सुधारकी व मानवी बनली, आणि कामगारांच्या ऐहिक स्थितीत लक्षणीय सुधारणा झाली. पण त्याच प्रक्रियेमधून भांडवली अर्थव्यवस्था जास्तच दृढ झाली, बलवान झाली. 'जागतिकीकरण' — 'उदारीकरण' विरूद्ध राष्ट्र-राज्यांच्या पातळीवर तसेच जनसंघटनांच्या पातळीवरून जे डावपेच लढविले जात आहेत, जे 'लढे'संघटित केले जात आहेत, जी 'एकजूट' निर्माण केली जात आहे त्याद्वारा याच मर्यादांमध्ये काही गोष्टी जरूरच साध्य करता येतील; व्यवहारात त्याचेही महत्त्व आहे व उपयोग आहे. पण आपण सारेच ही नवी जागतिक अर्थव्यवस्था प्रत्यक्षात मान्य करीत आहोत, गत्यंतरच नाही म्हणून तिच्याशी जुळवून घेत आहोत ही वस्तुस्थिती मान्य करावयास हवी.

योग्य व आवश्यक तेवढी किंमत जर मन घट्ट करून आपण वेळीच चुकविली तर राष्ट्र-राज्य म्हणून अर्थव्यवस्थेच्या पातळीवर 'प्रगत' व 'शक्तीशाली महासत्ता' म्हणून आपण प्रकट होऊ, ती संभाव्यता आज आपल्यापाशी आहेच आहे, असे म्हणणाऱ्यांचे काय? या मंडळींच्या युक्तिवादात काहीच तथ्य नाही; एकतर ती आत्मवंचना आहे, आणि ज्यांना किंमत चुकवावी लागणार आहे त्यांच्या जिवाशी तो खेळ आहे, अशी

अनुक्रमणिका

आपली टीकाटिप्पणी असते. पण या नव्या जागतिक आर्थिक-राजकीय व्यवस्थेचे घटक बनण्याशिवाय गत्यंतरच नसेल तर? तर मग 'शेरास सव्वाशेर' बनण्याची आकांक्षा बाळगून 'जागतिकीकरण' — 'उदारीकरण' हीच वाट का पकडू नये? आजच्या गतिमान व वर्धिष्णू आर्थिक व्यवहारांमध्ये कोठे मोठ्या संधी आहेत ते हेरून त्यांच्यावर झडप घालण्याची कल्पकता व साहस प्रकट केले तर एरवी आपणास आज जी दु:सह किंमत मोजावी लागते आहे ती पण एकदम कमी होईल, हा युक्तिवाद गंभीरपणे विचारात घ्यावा इतके तथ्य त्यामध्ये आहे.

### सशक्त राष्ट्र-राज्याची गरज

आजचे विदारक वास्तव हे आहे की एक देश म्हणून आपण स्वत:ला दुबळ्या व परावलंबी स्थितीत आणून ठेवले आहे. जागतिक अर्थव्यवस्थेशी बऱ्यापैकी एकजीव झालेली आपली अर्थव्यवस्था आहे. जागतिक अर्थव्यवस्थेच्या चौकटीत राहूनच, नजिकच्या भविष्यकाळात तरी, आपणास स्वत:चे दुबळेपण व परावलंबित्व दूर करण्यासाठी ठोस पावले टाकली पाहिजेत. हे आव्हान आपण झेलू शकलो तरच आपली वाट मोकळी होणार आहे.

यासाठी 'जागतिकीकरण' — 'उदारीकरणा'चे केवळ खंडन पुरे पडत नाही ही गोष्ट एव्हाना स्पष्ट झाली आहे. रूढ चाकोरीतल्या निषेधपर कृतींनी पण आपण आजवर फार काही साधू शकलेलो नाही. वेळ न दवडता करावयाच्या गोष्टी कोणत्या आहेत?

'जागतिकीकरण' — 'उदारीकरण'ने उपस्थित केलेले आव्हान यशस्वीपणे झेलावयाचे झाल्यास केंद्रातील सरकार मजबूत हवे, त्याचा संकल्प व निर्धार सुस्पष्ट व खंबीर हवा ही गोष्ट पण आपल्या लक्षात आलेली आहे. भाजपच्या नेतृत्वाखालील आघाडी सरकारचे हात बळकट करूया, त्याच्या पाठीशी आपण सारे एकजुटीने उभे राहूया, असे मला म्हणावयाचे नाही. या सरकारला समर्थ, विधायक व सर्जनशील पर्याय उभा करण्याची गोष्ट कशी घडवून आणावयाची, हा आपल्यापुढील पहिला गंभीर पेच आहे. दुसरा पेच, आर्थिक-राजकीय विकल्पाचा आपला आराखडा व रणनीती फार धूसर आहे, हा आहे. तिच्या सर्व कमकुवतपणांसह व मर्यादांसह लोकशाही राज्यपद्धती व व्यवस्था आपणास स्वीकृत असेल तर, पुरेशा संख्येने लोक आपल्या पाठीशी नाहीत, हा आपला तिसरा पेच आहे.

राष्ट्र-राज्यात्मक जागतिक व्यवस्थेत आपणास नजिकच्या भविष्यकाळात कार्य करावयाचे आहे. याचा अर्थ असा की, राष्ट्र-राज्याची भूमिका मध्यवर्ती व निर्णायक आहे. ही भूमिका यशस्वीपणे पार पाडावयाची तर राष्ट्रात ऐक्य हवे आणि राज्य बलशाली हवे. पण एकाधिकारशाही आशयाचे व आकाराचे ऐक्य व बळ आपणास नको आहे हेही आपले पक्के ठरले आहे असे मी गृहीत धरतो. म्हणजे कामगिरी जास्त अवघड आहे.

आता, आपणास हे माहीत आहे की, राष्ट्र-राज्य ही रचना जगात ठळकपणे व ठोसपणे १८व्या-१९व्या शतकात अस्तित्वात आली. ती अस्तित्वात येण्यासाठी एक ना एक प्रकारच्या लोकशाहीची कास धरावी लागली. प्रातिनिधिक जबाबदार राज्यपद्धतीची चौकट स्वीकारावी लागली. याच काळात 'राष्ट्रवाद' ही विचारव्यूहप्रणाली पुढे आली. राष्ट्रवादाचे अधिष्ठान अंतिमत: भावनात्मक असते. 'आपण सारे एका राष्ट्राचे आहोत' ही भावना उत्कटपणे जाणीवेत आणि नेणीवेत खोलवर रुजलेली असावी लागते. मग त्या भावनेला निष्ठेचे रूप प्राप्त होते, तो आशय मूर्त होतो. 'मातृभूमी', 'भारतमाता', 'राष्ट्रपिता', 'इंदिरा इज इंडिया' या व यांसारख्या शब्दप्रयोगांचे मर्म लक्षात घ्यायला हवे. 'ग्रेट ब्रिटन' (ज्याला आपण एरवी 'इंग्लंड' म्हणतो) वा 'युनाटडेड किंग्डम' हे वस्तुत: इंग्लंड, वेल्स, स्कॉटलंड व उत्तर आयर्लंड (अल्स्टर) या प्रांतांचे मिळून बनलेले आहे. या प्रांतांत स्वायत्तता प्राप्त करण्यासाठी चळवळी चालल्या आहेत. त्याचवेळी, इंग्रजांचा राष्ट्राभिमान किती जाज्वल्य व उत्कट ते दुसऱ्या महायुद्धात प्रकर्षाने अनुभवाला आले. आज अनेक अभ्यासकांनी विशद केल्यानुसार 'राष्ट्र' ही अंतिमत: 'काल्पनिक समष्टी' (Imagined Community) असते. पाकिस्तानचे उदाहरण घ्या. आग्रहाने पाकिस्तानची निर्मिती केली गेली; पण ज्या टप्प्यावर 'आपण पाकिस्तानी नाही' असे पूर्व पाकिस्तानातील मुसलमानांच्या मनाने घेतले त्या टप्प्यावर दोन राष्ट्रे अस्तित्वात आली. या कारणाने 'राष्ट्र' ही बांधणी नाजुकच (fragile) राहते; ती फुटायला, मोडून पडायला फार वेळ लागत नाही. कारण एका अर्थी तो भावनेचा, कल्पनेचा मामला असतो. म्हणून अनेक उपक्रमांद्वारे राष्ट्रवाद जोपासत राहावा लागतो. प्रतिके उत्पन्न करून रुजवावी लागतात, त्यांची महती गात राहावी लागते.










### भारतीय राष्ट्रवादाची मांडणी

विस्तृत भौगोलिक प्रदेशावर पसरलेला, लोकसंख्येने मोठा आणि अनेक लोकसमूह असलेला संमिश्र असा बृहत् समाज घेतला — आणि भारतीय समाज असाच आहे — तर त्यात अंतर्गत भेद, विषमता, ताण व कलह आढळतातच. महात्मा फुले यांच्या भाषेतला 'एकमय' समाज कोठेच आढळणार नाही. राष्ट्रवादाची जोपासना, मनावरची त्याची खोलवरची पकड, राष्ट्राला निष्ठा यांच्यासाठी या सगळ्या 'चिरफळ्यां'वर (fault lines) मात करू शकणारा आधार राष्ट्रवादाला द्यावा लागतो, आणि तो लोकांनी, बहुसंख्य लोकांनी मनोमन स्वीकारलेला असावा लागतो.

एकोणिसाव्या शतकाच्या आरंभी भारतावर इंग्रजांची राजवट प्रस्थापित झाली. आधुनिक अर्थाने आपण एका राष्ट्राची उभारणी करायला हवी हा विचार १८५० च्या आसपास उदय पावला, आणि १८७० नंतर त्या उद्देशाने एक सभा स्थापन करण्याचा विचार भारतभर रुजत गेला. १८८५ साली राष्ट्रसभेत तो मूर्त झाला. एकराष्ट्रीयत्व साध्य करावयाचे तर राष्ट्रवादाची मांडणी करणे आवश्यक होते. राज्यकर्ते त्यांच्या हितसंबंधांपोटी येथील समाज किती अंगांनी चिरफाळलेला आहे याची उजळणी करीतच होते. त्याचे भान येथील राष्ट्रवादाचे प्रवक्तेपण करणाऱ्या नवशिक्षितांना चांगलेच होते. येथील कमालीचा बहुजिनसीपणा ध्यानात घेऊन त्यांनी भारतीय राष्ट्रवादाची वैशिष्ट्यपूर्ण अशी मांडणी केली.

या मांडणीचे आगळेवेगळेपण आणि वास्तविक थोरपण समजून येण्यासाठी तौलनिकदृष्ट्या आपणास पश्चिमी राष्ट्रवादी विचारप्रणालीच्या वैशिष्ट्यांवर नजर टाकावयास हवी. लिबरॅलिझमच्या बैठकीवरील लोकशाही आणि राष्ट्रवाद यांचा आंतरिक संबंध वर नोंदविला आहे. राष्ट्रवाद आणि साम्राज्यवाद यांचाही असाच आंतरिक संबंध आहे. जगावरच्या प्रभुत्वासाठी एकमेकांशी सत्तास्पर्धा करण्यामधून युरोपात राष्ट्र-राज्यांची बांधणी अठराव्या-एकोणिसाव्या शतकांमध्ये झाली. युरोपीय राष्ट्र-राज्यांनी भांडवली अर्थव्यवस्थांची आपापल्या देशात पुष्टी करण्यामागेही त्यांच्या याच प्रकारच्या आक्रमक, विस्तारवादी आकांक्षा होत्या. पाश्चात्त्य राष्ट्रवादाच्या या आक्रमक, विध्वंसक, विस्तारवादी चारित्र्याची ओळख रवींद्रनाथ टागोरांना फार लौकर पटली, आणि विसाव्या शतकाच्या आरंभीच या जातकुळीच्या राष्ट्रवादाची कठोर टीकाटिप्पणी परदेशांमध्ये दिलेल्या व्याख्यानांमध्ये त्यांनी केली. विशेष ध्यानात घेण्याची बाब ही आहे की, पश्चिमी राष्ट्रवादामध्ये एक 'शत्रू राष्ट्र' नावाचा घटक बहुतेकवेळा आढळतो, आणि राष्ट्र प्रबळ करावयाचे म्हणजे स्वतःच्या प्रभुत्वाखाली इतर समाज व राष्ट्रे आणावयाची असे गृहीततत्त्वच आढळते. किंबहुना, राष्ट्र प्रबळ असण्याची ती खूणच.

भारतीय राष्ट्रसभेच्या नेत्यांनी एका अनाक्रमक व आंतरराष्ट्रीय सामंजस्य व सहकार्य यांवर भर देणाऱ्या, मैत्रीपूर्ण राष्ट्रवादाची मांडणी केली. हा राष्ट्रवाद सर्वांना बरोबर घेऊन जाणारा, लिबरॅलिझमची तत्त्वे मनःपूर्वक आत्मसात केलेला राष्ट्रवाद होता. My country, right or wrong अशी अंध, दुराभिमानी व कट्टर भूमिका अंगिकारायला नकार देणारी ही राष्ट्रवादी मांडणी होती. राष्ट्र म्हणून भारताची बांधणी यशस्वी व्हावयाची असेल तर सामाजिक सुधारणा आवर्जून करावयास हव्यात याविषयी सहमती होती. राष्ट्रसभेच्या व्यासपीठावरून केवळ राजकीय प्रश्नांचीच मांडणी व्हावी ही भूमिका यासाठी घेतली होती की, येथील विभिन्न धार्मिक जमातींचे सामाजिक-धार्मिक सुधारणांचे कार्यक्रम एकसारखे असू शकत नव्हते. शिवाय, सामाजिक सुधारणांवरून मतमतांतरेही होती. म्हणून काँग्रेस हे फक्त राजकीय व्यासपीठ ठेवणे इष्ट व आवश्यक मानले गेले. काँग्रेसच्या संस्थापकांपैकी जवळपास सर्वच जण आपापल्या समाजाच्या/जमातीच्या सामाजिक-धार्मिक सुधारणांच्या कार्यक्रमात सक्रिय होते हे लक्षांत ठेवले पाहिजे. हिंदू नेतेमंडळींच्या मनात, अग्रक्रमाने, स्त्रियांना दिली जाणारी वागणूक, जातिभेद व स्पृश्यास्पृश्यता यांची तीव्रता, शिक्षण, धार्मिक रूढी व अंधश्रद्धा हे मुख्य विषय होते.

पश्चिमी जातकुळीच्या राष्ट्रवादाच्या प्रभावाखालून, दुर्दैवाने, येथील हिंदू व मुस्लिम नेते पूर्ण मुक्त राहू शकले नाहीत. मुस्लिम राज्यकर्त्यावर्गाच्या मनात हिंदुस्थान व त्यामधील हिंदू जन यांना आपण जिंकून घेतले आहे, हा आपला मूळ मुलूख नव्हे, आणि इस्लाम हाच एकमेव सच्चा धर्म आहे, ही भावना शतकानुशतके कायम राहिली; धर्मांतरित मुसलमान (जे मूळात हिंदूच होते, आणि सामान्यतः हीन वा अस्पृश्य गणल्या जाणाऱ्या जातींमधले होते) समाज मोठा होता पण अभिजन, राज्यकर्ता मुसलमान यांना तुच्छच लेखत असे. यांचे संबंध, व्यवहारात, येथील हिंदूंशीच जास्त असत. हिंदू जनांच्या दृष्टीने, मुस्लिम राजवटींची मुलकी वा लष्करी चाकरी ते इमानेइतबारे करीत






असतानाही, मोठ्या हुद्यांवर हिंदूंच्या नेमणुका होत असल्या तरी, मुसलमानी राजवटी या लष्करी बळावर चालणाऱ्या सरंजामशाही परक्या राजवटीच राहिल्या. ईस्ट इंडिया कंपनीने आपला व्यापार वाढविला आणि व्यापाराच्या ओघात त्यांची राजकीय सत्ताही प्रस्थापित होत गेली तसा येथे, त्यांच्या व्यापारवृद्धीच्या बळावर, त्यांचा हस्तक (agent) म्हणता येईल असा एक सधन मध्यमवर्ग — दुभाष, ठेकेदार, व्यापारी, मालाची वाहतूक व दळणवळण सांभाळणारे, व्यापारी-सावकार इत्यादी — उत्कर्ष पावला. हा बव्हंशी हिंदू होता. आणि, असे दिसते की, तो पारंपरिक उच्चजातीय त्रैवर्णिकांपैकी होता असे नाही. भारतभर पसरलेल्या अनेक हिंदू जमीनदार, सरदार-दरकदार, शिपाईगडी ह्यांनी (उत्तरेत कंपनीच्या सैन्यात ब्राह्मण व सवर्ण यांचे प्रमाण मोठे होते) इंग्रज राजवटीचे स्वागतच केले, कारण ते आधीच त्यांच्या बाजूचे तरी होते वा त्यांच्या पाठिंब्यावर अवलंबून होते. १८५७ चा उठाव मुख्यत्वेकरून उत्तर भारतात झाला. आपली सत्ता गेल्याचा मुसलमान राज्यकर्त्या अभिजन-वर्गाला तीव्र अनुभव आला तर ब्रिटिश राजवटीने मुस्लिम राजवटींचे सावट/बोजा हटवून आपल्या उत्कर्षाच्या वाटा मोकळ्या केल्या अशी हिंदूंमधील नवोदित सधन वर्गाची धारणा बनली. दीडशे वर्षांपूर्वीच्या इतिहासात खोलवर व तपशीलात येथे न जाताही असे म्हणूया की, आपापल्या समाजाचे बळ वाढविण्या-साठी पश्चिमी राष्ट्रवादी अस्मिता उभय समाजाच्या पुढाऱ्यांनी आपापल्या समाजांमध्ये जोपासली. ब्रिटिश राज्यकर्त्यांची मर्जी संपादन करण्याचे महत्त्व ओळखलेल्या सर सय्यद अहमद खान यांच्यासारख्या नेत्यांनी राष्ट्रसभा प्रवर्तित करीत असलेल्या सर्वसमावेशक राष्ट्रवादाला नकारात्मक प्रतिसाद देण्याचे जाणीवपूर्वक ठरविले. आपली भारतावरील सत्ता हटविण्याच्या उद्देशाने आपल्या पायाशी पेरला जात असलेला राष्ट्रसभा हा सुरुंग आहे हे चाणाक्ष ब्रिटिश राज्यकर्त्यांनी जाणले आणि, वारे कोणत्या दिशेने वहात आहेत हे ओळखून, मुस्लिम समाजातील अभिजनवर्गाने काँग्रेसशी असहकार्याची भूमिका घेऊन ब्रिटिश राज्यकर्त्यांची मर्जी संपादन करण्याची नीती अंगीकारिली. इकडे, काँग्रेसमधील उत्तर भारतातील शहरी, नवोदित हिंदू अभिजनवर्गाने ब्रिटिश राजवट हे वरदान मानले ही गोष्ट आपणास माहीत आहे. या नवोदित हिंदू अभिजनवर्गाचे स्थानिक पातळीवर वरचढ मुस्लिम अभिजन-वर्गाशी कलह निर्माण झाले. हिंदी भाषेचे शासकीय व्यवहारातील स्थान, गोरक्षा चळवळ, धार्मिक उत्सव यांमधून राष्ट्रवादी (व त्याच वेळी मुस्लिमविरोधी) हिंदू अस्मिता बांधली गेली. सर्व भारतभर 'उर्दू', ही मुसलमान समाजाची धर्मभाषा वा रोजच्या व्यवहाराची भाषा होती असे नाही. उत्तरेत जेथे उर्दूचे खास प्रचलन होते तेथे ती हिंदू व मुस्लिम, उभय समाजांची भाषा होती. असेही दिसते की, भारतात गो-वंश मांसभक्षण व त्यासाठी गाई-बैलांची हत्या ही ब्रिटिशांनी वाढविलेली गोष्ट आहे.

मुद्दा असा की, राष्ट्रसभेच्या संस्थापकांनी सर्वसमावेशक, अनाक्रमक व लिबरल मूल्यांवर अधिष्ठित राष्ट्रवादाची मांडणी, 'शत्रू' डोळ्यांसमोर न धरता व ठेवता विस्तारवादी मानस उत्पन्न न करता केली खरी, पण तिला अशी आरंभालाच खीळ बसली.

आपली सत्ता येथे निर्वेध व बळकट राहावयाची असेल तर येथे सर्वांना कवेत घेणाऱ्या राष्ट्रवादी विचारप्रणालीला रुजण्यास, शक्तिशाली बनण्यास अवसर देता कामा नये, त्या दिशेने होणाऱ्या सर्व प्रयत्नांना खीळ बसेल असे डावपेच लढविले पाहिजेत हे ब्रिटिश राज्यकर्त्यांनी लौकरच जाणले. थोडे बारकाईने ध्यान दिले तर लक्षात येईल की, साडेपाचशेहून जास्त संस्थाने (म्हणजे राजघराणी) भारतात कायम ठेविली गेली. येथे तालुकदार, जमीनदार, मालगुजार, इनामदार वगैरेंचा एक मोठा सरंजामदार वर्ग सुरक्षित राखला, जोपासला. हे राष्ट्रवाद व राष्ट्रैक्य यांच्या वाटेतल्या भल्यामोठ्या धोंडी म्हणून काम करतील हा त्यांचा वस्तुनिष्ठ आडाखा होता. पुढे 'घटनात्मक सुधारणां'च्या द्वारा प्रातिनिधिक जबाबदार राज्यपद्धती विकसित करण्याचे ठरले त्यावेळी विभक्त मतदार संघ, जागा वाटप, जातजमातनिष्ठ राजकीय संघटन यांना उत्तेजन दिले गेले. आपल्याला असे दिसते की, पारशी, शीख, अँग्लो-इंडियन, ब्राह्मणेतर, मुस्लिम असे जास्तीत जास्त विभाग पाडून तटबंद्या बळकट करण्याचा जणू विडाच उचलला गेला. या तुकडे पाडण्याच्या राजकारणाचा उच्चांक १९३० नंतर भरलेल्या गोलमेज परिषदेत गाठला गेला.

एका अंगाने पाहिल्यास, भारतीय समाज धर्म, भाषा, जात, जमात, आदिवासी, शहरी-खेडूत, जमीनदार-कुळे-शेतमजूर, कामगार-मालक अशा अनेकानेक प्रकारे चिरफाळलेला समाज होता, व आजही आहे, यात शंका नाही. गेले दीडशे वर्षे येथे साम्राज्यवादी प्रभुत्वाखाली आणि बेरकी राजनीतीच्या प्रभावाखाली जे राजकारण खेळले गेले त्यामुळे सर्व भारतीयांना एक करणारा

राष्ट्रवाद दुबळाच राहिला. राष्ट्र म्हणून आपली भावनात्मक-वैचारिक बांधणी कच्ची राहिलेली असतानाच, एका विशिष्ट परिस्थितीच्या रेट्यामुळे (compulsion) ब्रिटिशांनी येथे सत्तांतर केले. पण पाया कच्चाच राहिला.

खेदाची गोष्ट ही आहे की, राष्ट्रबांधणीचे काम किती कच्चे राहिले आहे याचे भान काँग्रेसच्या नेत्यांना उरले नाही. लोकशाही राज्यपद्धतीमध्ये जेव्हा मते अनेक पक्षांमध्ये, समाजघटकांमध्ये विभागलेली असतात तेव्हा गठ्ठामतांच्या आधारे तडजोडीचे संधिसाधू राजकारण, सौदेबाजीचे राजकारण व त्या आधारे चालणारा सत्तेचा खेळ फोफावतो. यामधून राष्ट्रैक्य खिळखिळे बनत राहते. विशेषतः, मुळातच पाया कच्चा असला तर खासच. काँग्रेसचे स्वातंत्र्यलढ्याच्या काळातले संस्कारसंपन्न नेतृत्व सत्तेवर होते, काँग्रेसची सत्ता देशव्यापी होती आणि प्रशासन-सैन्य-पोलिस या संस्था/यंत्रणा 'पोलादी', कार्यक्षम होत्या तोवर पायाशी असलेल्या कच्चेपणाची भरपाई होत राहिली. या वीस वर्षांच्या काळात पाया पक्का करण्याचे कार्य केले गेले नाही. एकाच पक्षाची केंद्रात व राज्यांमध्ये सत्ता असण्यावर, नियोजनबद्ध आर्थिक विकासावर, सनदी प्रशासनसेवा व नोकरशाही आणि पोलिस-सैन्य यांच्यावर आपली भिस्त राहिली.

आपापला प्रादेशिक, जातजमातीय, धार्मिक-सांस्कृतिक, आर्थिक-राजकीय स्वार्थ साधण्यापलीकडे भारत राष्ट्राचे, भारताच्या पर्यावरणाचे, भारतातल्या विभिन्न प्रदेशांचे, आम भारतीय लोकांचे हित साधण्यासंबंधी आपले कोणतेच उत्तरदायित्व न मानणाऱ्या, संकुचित दृष्टी बाळगणाऱ्या अनेकानेक पक्ष व त्यांचे पुढारी यांच्या आघाडीच्या द्वारा केंद्रात सत्ता सांभाळावी लागत आहे ही वस्तुस्थितीच राष्ट्र-राज्य म्हणून आपण किती दुबळे व कच्चे आहोत ते उघड करते.

### संघपरिवाराच्या घातक हिंदुराष्ट्रवादाचा प्रतिवाद

राष्ट्रवादी विचारप्रणालीच्या आधारे बलिष्ठ राष्ट्र-राज्य निर्माण करण्याचा एक कार्यक्रम राष्ट्रीय स्वयंसेवक संघ, विश्व हिंदू परिषद, भारतीय जनता पक्ष राबवीत आहे. साधारणपणे गेली पंधराएक वर्षे ही मंडळी 'हिंदुराष्ट्रा'च्या संकल्पनेच्या आधारे एका राष्ट्रवादाची मांडणी आक्रमकरित्या करीत आहेत. या राष्ट्रवादाची बांधणी एकाहून अधिक 'शत्रू' डोळ्यासमोर ठेवून केली जात असल्याने ती कट्टर व हिंस्र वळणाने जाणारी आहे. भारतीय समाजातले मुसलमान व ख्रिश्चन हे समाजघटक शत्रूस्थानी आहेत हे विहिंप/बजरंगदल आदि संघटनांची वक्तव्ये व कृती यांवरून स्पष्ट होते. जे जे 'परकीय' ते ते त्याज्य, निपटून काढण्यायोग्य अशीही भूमिका या राष्ट्रवादाच्या मागे आहे. उदा. साम्यवाद, समाजवाद या विचारप्रणालींना, त्या परकीय, तसेच अध्यात्म व आर्यसंस्कृतीचे श्रेष्ठत्व नाकारणाऱ्या म्हणून रा.स्व. संघाचा टोकाचा विरोध राहिला ही गोष्ट सर्वश्रुत आहे. हिंदुराष्ट्रवादाला एक आर्यश्रेष्ठत्वाचा वांशिक-सांस्कृतिक आशय व आकारही आहे. त्याची मांडणी धर्म व भाषा यांच्या आधारे केली जाते. वैदिक धर्म, अद्वैत वेदान्त, औपनिषदिक तत्त्वज्ञान, संस्कृत, संस्कृतनिष्ठ हिंदी यांचा गौरव केला जातो. हिंदुराष्ट्रवादी विचारप्रणालीतही मतमतांतरे आहेत. कोणत्या घटकांना उठाव किती द्यायचा, वा कोणते घटक काही काळ पडद्याआड ठेवायचे याविषयी धोरणीपणा राखून डावपेच लढविले जात असल्याचे आपण पाहतो.

हिंदुत्ववादी पक्षातल्या आग्रही व आक्रमक नेतेमंडळींना असे वाटत आहे की नरसिंहाचा अवतार (व भाषा) धारण करण्याची वेळ आली आहे. गोध्रा जळितानंतर गुजराथमध्ये जो हिंसाचार घडला — आणि घडविता आला — त्याचे प्रमाण व त्याचा दीर्घ काळ, या सर्व काळात प्रशासनयंत्रणा, पोलिस यांचे पक्षपाती वर्तन या मंडळींचा उत्साह वाढवितात.

तात्पर्य, प्रतिस्पर्धी शत्रू डोळ्यांसमोर ठेवून पश्चिमी जातकुळीचा आक्रमक हिंस्र व विस्तारवादी राष्ट्रवाद आज उघडपणे जोपासला जात आहे. या प्रयत्नांना हिंदू अस्मिता बाळगणाऱ्या अनेकांचा प्रतिसाद मिळत आहे. हिंदुराष्ट्रवादी हे शक्तिशाली राष्ट्र-राज्याचे पुरस्कर्ते आहेत, त्यांच्या अर्थाने हिंदुत्ववादी आहेत म्हणून केवळ लोकांचा प्रतिसाद मिळत आहे हे खरे नाही. मुस्लिम व ख्रिश्चन समाजांविषयी खोलवर रुजलेले ग्रह-पूर्वग्रह, त्या समाजांच्या राजकारणाविषयीचे समज-गैरसमज, पाकिस्तानचे सततचे शत्रुत्व व त्याविषयी बव्हंशी औपचारिक नाराजी दाखविण्यापलिकडे न जाण्याची मुस्लिम पुढाऱ्यांची नीती, वाढती धार्मिक-राजकीय कट्टरता (तबलीग जमातसारख्या संघटनांचा वाढता प्रभाव व विस्तार), जागतिक पातळीवरही मुस्लिम दहशतवादी कृत्ये/चळवळी अशा अनेक घटकांमुळेही वाढता प्रतिसाद मिळत आहे.

यापलिकडचे एक कारण आहे. गौरवशाली इतिहास असलेले भारत हे राष्ट्र आहे, आणि त्याला पुन्हा एकवार अव्वल मान असलेले राष्ट्र म्हणून उभारावयाचे आहे, ते एक

शक्तिमान महासत्ता बनले पाहिजे, असा कडवा राष्ट्राभिमान जोपासणारा संघपरिवार हा आजच्या घडीला एकच पक्ष आहे असे हिंदू समाजाला आढळते. पुरोगामी सेक्युलर पक्ष, चळवळी इत्यादी प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे हिंदू समाजाचा अधिक्षेप करण्यात धन्यता मानतात असा त्याचा अनुभव आहे. आता, भारतात हिंदू अस्मिता बाळगणारे, हिंदू म्हणून ओळखले जाणारे लोक बहुसंख्य आहेत, आणि आपले राष्ट्र म्हणावे असे त्यांच्यासाठी भारत हेच एक राष्ट्र आहे. ही दुहेरी वस्तुस्थिती आहे. येथेच आपल्याला गौण ठरविण्याची गोष्ट चालावी याचा त्यांना राग यावा, या प्रकारच्या वक्तव्यांना, उपक्रमांना त्यांची तीव्र प्रतिक्रिया यावी हे स्वाभाविक नाही काय?

याचा अर्थ, हिंदुत्ववाद्यांचा हिंदुराष्ट्रप्रस्थापनेचा अजेंडा योग्य आहे, असा मुळीच नाही. कोणाकोणाला अ-भारतीय, परके व धर्मामुळे 'अराष्ट्रीय' ठरवू पाहणाऱ्या जातकुळीचा हिंदुत्वविचार ही आपणा सर्वांचा घात करणारीच गोष्ट आहे. हा देश आपला, केवळ एका हिंदू समाजाचा नव्हे; या देशाचा समग्र इतिहास, परंपरा व संस्कृती आपली, असे मनःपूर्वकतेने मानणाऱ्या सर्वांचे हे भारत नावाचे राष्ट्र आहे हीच एक-राष्ट्रीयत्वाची बैठक होऊ शकते, ही गोष्ट पक्की. या मुद्याची थोडी अधिक चर्चा आपण पुढे करू. प्रथमतः जो मूळ मुद्दा उपस्थित केला होता त्याच्याशी येथवरचे विवेचन आपण जोडून घेऊ. 'जागतिकीकरण'—'उदारीकरणा'चे आव्हान यशस्वीपणे झेलण्यासाठी मजबूत, चाणाक्ष, चोख-कार्यक्षम असे सशक्त राष्ट्रराज्य असणे ही आपली गरज आहे. यासाठी खोलवर रुजलेले राष्ट्रैक्य व राष्ट्रनिष्ठा यांची आवश्यकता आहे. या बाबतीत आपण आज फार कच्चे व दुबळे आहेत. हा तो मुद्दा होता, व आहे.

विचारवेध संमेलनाच्या व्यासपीठावर एकत्र आलेल्या परिवर्तनवादी चळवळीने स्वतःस विचारावयाचा प्रश्न असा की, त्याची राष्ट्रवादी बैठक कोणती आणि हा राष्ट्रवाद लोकांमध्ये रुजवून राष्ट्रनिष्ठा व राष्ट्रैक्य प्रखर बनविण्याचा तिचा कार्यक्रम कोणता आहे? आमचा राष्ट्रवाद हा हिंदुत्ववाद्यांच्या हिंदुराष्ट्रवादापेक्षा कोणकोणत्या बाबतीत वेगळा आहे, आणि तो अधिक सरस कसा आहे, हे लोकांपर्यंत पोचविण्याचा आमचा कार्यक्रम कोणता आहे?

धर्म, भाषा, जातजमात इत्यादी बाबींवरून आपल्यात असलेल्या चिरफळ्यांना सतत उठाव देऊन, त्यांच्यावर बोट ठेऊन आपण जर असे म्हणत राहिलो, की आम्ही कधी एक लोक व समाज नव्हतोच; भारताची म्हणून जी इतिहास-परंपरा म्हणतात ती अमुक-तमुकाची असेल पण ती आमची नाही, ती आमच्यावर जुलूमाने लादलेली आहे; तेव्हा हे राष्ट्रही आमचे नव्हे, राज्यघटना, ध्वज, राष्ट्रनेते वगैरे गोष्टीही आमच्या नव्हेत, आणि हा आमचा समाजही नाही तर राष्ट्रवादाच्या उभारणीसाठी आम्हाला पायाच सापडत नाही, सापडणार नाही. आपण एक राष्ट्र, एक लोक, आपली एक इतिहास-परंपरा, एक संस्कृती या, अंतिमतः, मनोमन मानावयाच्या मानीव गोष्टी (imagined shared things) असतात, पण त्या तशा मनोमन आपल्याशा होतात तेव्हाच राष्ट्र उभे राहते. अमेरिकेचे उदाहरण घेऊया. अमेरिका हे राष्ट्र तर अक्षरशः अठराव्या शतकाच्या अखेरीस अमेरिकेच्या भूमीवर जाऊन वसाहती उभारलेल्या गौरवर्णीयांनी (बव्हंशी प्रॉटेस्टंट ख्रिश्चन पंथीयांनी) स्थापन केलेले राष्ट्र. तेथील मूळ रहिवासी जमातींच्या मोठ्या प्रमाणावर कत्तली करूनच, त्यांची भूमी बळकावूनच सर्व उपखंडभर पश्चिमेच्या दिशेने अमेरिकेचा विस्तार झाला. आफ्रिकेतून आणलेल्या आफ्रिकी लोकांना गुलाम म्हणून राबविले. प्रेसिडेंट अब्राहम लिंकन यांच्या कारकीर्दीत झालेल्या यादवी युद्धानंतर एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावर 'निग्रों'ना अमेरिकन राष्ट्रात नागरिक म्हणून सामावून घेण्याची प्रक्रिया सुरू झाली. मूळ आदिवासी जमातींपैकी जे उरले होते त्यांना समान दर्जाचे नागरिक म्हणून सामावून घेण्याची प्रक्रिया तर याच शतकात सुरू झाली. जहाल निषेधपर प्रतिकारात्मक चळवळी 'निग्रो' समाजात उभ्या राहिल्या; त्यांनी 'निग्रो' हा शब्दही नाकारला पण आपण अमेरिका याच राष्ट्राचे, आणि आपण सगळे मिळून एकच लोक व राष्ट्र आहोत, ही त्यांची मनोमन स्वीकृती आहे. अमेरिकेतील आदिवासींच्या (रेड इंडियन) संदर्भात आपला अपराध मान्य करण्याची घडामोड अगदी अलीकडची आहे.

दुर्दैवाने, स्वातंत्र्योत्तर काळात पुरोगामी, डाव्या, सेक्युलर परिवर्तनवादी चळवळीने, हिंदू धर्म, समाजव्यवस्था व संस्कृती यांच्या परिष्करणाचा आग्रह राखण्याच्या भूमिकेचा त्याग करून, त्यांचा उच्छेद करण्याचीच मागणी आग्रहाने पुढे ठेवली आहे. महात्मा फुले व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा वारसा सांगत, समाजाचे पाऊल पुढे पडण्याची शर्त म्हणूनच ही मागणी ती चळवळ करीत आहे असे चित्र उभे राहिले आहे. जे जे हिंदू ते

ते नाकारणे, जो जो हिंदू त्याला त्याला प्रतिगामी, परिवर्तनाच्या विरोधी, हिंदुत्ववादी व शत्रू ठरविणे यावर जोर दिला जात आहे.

येथील बहुसंख्य हिंदू समाजाला मध्यवर्ती ठेवूनच भारतीय राष्ट्राची उभारणी होऊ शकते. या देशातील मुस्लिम, ख्रिश्चन, शीख, इत्यादी समूहांना वगळून वा त्यांना शंकास्पद ठरवून भारत राष्ट्राची सशक्त बांधणी शक्य नाही हे आपले म्हणणे योग्यच आहे. याच न्यायाने, हिंदू माणसांच्या भावनांचा अधिक्षेप करीत राहून, त्यांना वगळून येथे राष्ट्राच्या उभारणीचा प्रकल्प हातातही घेतला जाऊ शकत नाही. राष्ट्र म्हणून भारताची उभारणीच आपण अशी अशक्य केल्यावर भारतीय राज्यघटनेचे पावित्र्य व सार्वभौमत्व याविषयीचे प्रतिपादन पोकळ ठरते हे ध्यानात घेतले पाहिजे.

आपणा सर्वांसमोर विचारार्थ दोन तीन गोष्टी या संदर्भात ठेवावयाच्या आहेत. परिवर्तनवादी चळवळीचे काही नामवंत प्रवक्ते तिची जी वैचारिक मांडणी करीत आले आहेत तिच्या आधारे बेकी, बेबनाव, कलह यांनी समाजाला दुबळे बनविण्याचेच काम आजवर झाले आहे. समाजपरिवर्तनाचे पाऊलही ठोसपणे पुढे पडलेले नाही. हिंदुत्ववादी अराष्ट्रीय शक्तीच प्रबळ ठरत असल्याची सतत खंत व्यक्त केली जात आहे. याच वाटेने आपण यापुढे वाटचाल करीत राहिलो तर विचार व चळवळ म्हणून नामशेषच होऊ. या आत्मनाशाला आपणच जबाबदार असू.

भारतीय समाजातले सर्वच घटकसमूह त्यांच्या कमतरतांसह सर्व आपलेच आहेत, सगळे मिळून आपण एक समाज आहोत, एक लोक आहोत हाच प्रारंभबिंदू होऊ शकतो. हीच गोष्ट समाजव्यवस्था, तिच्यामागील तत्त्वविचार, इतिहास-परंपरा, संस्कृती यांची. हा सगळा वारसा आहे म्हणजे तो सगळा चांगला, राखण्यासारखा आहे असे आपण मान्य करतो असे नसते. समाजात राहून, समाज आपला मानून समाजाचे अंतर्बाह्य परिवर्तन घडवून आणावयाचे, हीच दृष्टी व भूमिका असायला लागेल.

दुसरी गोष्ट, आपण महात्मा फुले व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा वारसा सांगतो. या दोन महापुरुषांची थोरवी निर्विवाद आहे. पण विभूतिपूजा आपणाला कोणाचीच नको असायला हवी. तसेच ग्रंथप्रामाण्य, व्यक्तिप्रामाण्य आपण नाकारायला हवे. फुले व आंबेडकर यांचा प्रत्येक शब्द हा अंतिम सनातन सत्य म्हणून सर्वांनी स्वीकारला पाहिजे ही भूमिका बरोबर नाही. त्यांच्याही उक्ती-कृती यांची डोळस चिकित्सा करून नीरक्षीरविवेक करण्याची नितांत गरज आहे.

तिसरी गोष्ट, मुस्लिम असो वा शीख असो, त्यांचा धार्मिक, वांशिक, सांस्कृतिक, आक्रमक विस्तारवादी राष्ट्रवाद तितकाच गैर जितका त्या जातकुळीचा हिंदुराष्ट्रवाद. याच्याही पुढे जाऊन असे म्हटले पाहिजे की, 'अनार्य', 'दलित', 'आदिवासी' यांच्या आधारे आज प्रतिपादला जाणारा याच जातकुळीचा राष्ट्रवादही तेवढाच गैर आहे. (वरील तीन शब्द अवतरणचिन्हांत टाकले आहेत कारण हे तिन्ही शब्द बौद्धिक सोयीसाठी आपण वापरीत आलो आहोत अशा केवळ कोटी आहेत.)

'एक विश्व, एक शासन' ('One World, One Government') हे समाजवादी, साम्यवादी, विश्वैक्यवादी यांचे एकेकाळी ध्येय होते; ते शांततावादी व आंतरराष्ट्रीय मनोधारणेचे व विचारांचे म्हणून ओळखले जात. जगात न्याय, मैत्री, शांती नांदावी या ध्येयाशी सुसंवादी राष्ट्रवादाची एक वैशिष्ट्यपूर्ण मांडणी भारतात स्वातंत्र्यलढ्याच्या काळात केली गेली. न्यायमूर्ती रानडे, महात्मा गांधी, रवींद्रनाथ टागोर, पं. जवाहरलाल नेहरू यांच्यासारखे नेते आपणाला लाभले. महात्मा फुले यांचा स्त्रिया व शूद्रादि-अतिशूद्रांविषयीचा कळवळा ध्यानी घेता त्यांचा राष्ट्रवाद विशालहृदयीच असता. आंबेडकर हे तर हाडाचे राष्ट्रवादी होते.

तात्पर्य, संकुचित, आक्रमक, घातकी हिंदुराष्ट्रवादी विचारप्रणालीला समर्थ विधायक विकल्प ठरू शकणारी अशी राष्ट्रवादी विचारप्रणाली आपल्यापाशी आहे. गेली सव्वाशे वर्षे तिचीच कास आपण धरली होती. पण त्या राष्ट्रवादाचा सतत संस्कार झाला नाही आणि बदलत्या काळानुरूप संवर्धन केले गेले नाही. म. फुले व डॉ. आंबेडकर यांचा वारसा चालविण्याच्या नावे हे पूर्वसंचित गमावण्याची घोडचूक परिवर्तनवादी चळवळीने करू नये.

भारत आणि पाकिस्तान यांना, हिंदू व मुसलमान यांना संयुक्त असा एक प्राचीन काळापासूनचा समृद्ध वारसा आहे. याही पलिकडे, घोर अपराधी वाटावे, शरमेने मान खाली घालावी अशा जशा गोष्टी आहेत तशाच येथील अन्य लोकसमूहांनीही, रास्त अभिमान बाळगावा अशाही पुष्कळ गोष्टी आहेत. याच्या पायावर, सर्वांना ज्यात सन्मानपूर्वक सहभागी होता येईल अशी राष्ट्रवादाची मांडणी करण्याचे आणि आमूलाग्र परिवर्तनाची चळवळ ही राष्ट्रवादी चळवळही

असते हे दाखवून देण्याचे आव्हान परिवर्तनवादी चळवळीने झेललेच पाहिजे.

यात आपण यशस्वी झालो तरच 'जागतिकीकरण'–'उदारीकरण'चे 'आक्रमण' आपण पचवू शकू. एरवी, बोलत हवे ते राहिलो तरी, प्रत्यक्षात आपण शरणागत बनू.

### आधुनिक पश्चिमी सभ्यता हेच आव्हान

'जागतिकीकरण' – 'उदारीकरण'चे आव्हान राष्ट्र-राज्यांच्या चौकटीत संघटित जगाच्या मंचावर आज उपस्थित झालेले असल्याने त्याचा प्रतिवाद करण्यासाठी आपणास त्या चौकटीचाच तात्कालिक आधार घ्यावा लागणार आहे हे खरे असले तरी, आपण एका नव्या युगाच्या उंबरठ्यावर उभे आहोत, आज आपण एका युगान्ताच्या काळात जगतो आहोत असेही वर्णन करता येईल.

'जागतिकीकरण' — 'उदारीकरण' हा ज्या आधुनिक पश्चिमी सभ्यतेचा (civilisation) अद्ययावत आविष्कार आहे ती आधुनिक पश्चिमी सभ्यता हेच खरे तर आपल्यापुढील आव्हान आहे.

'जागतिकीकरण' — 'उदारीकरण'हे महासंकट आहे की ती एक भारताला आर्थिक महासत्ता बनण्याची उपलब्ध झालेली सुवर्णसंधी आहे यावरून देशात एकमत नाही, हे आपण जाणतो. नियोजनबद्ध आर्थिक विकासाच्या मार्गाने वाटचाल करीत असता शासकीय नियम, निर्बंध, सवलती, अर्थसाहाय्य, नियंत्रण यांचा आधार घेऊन अर्थव्यवहारावर सरकारी प्रभुत्व प्रस्थापित केले गेले. परकीय मदत, कर्जे यांची सहजी उपलब्धता या काळात होती. संरक्षक तटबंद्यांच्या आड अर्थव्यवस्था दीर्घ काळ राहिल्याने, आंतरराष्ट्रीय बाजारपेठेतील स्पर्धेत आपणास उतरावे लागले नाही. वेगवेगळ्या कारणांमुळे आर्थिक व्यवहारांमध्ये कामचुकारपणा, गलथानपणा, ऐदीपणा, भ्रष्टाचार, लुटारूपणा, बेशिस्त यांचा सुळसुळाट होत गेला आणि अनेकानेक संघटित स्वार्थी हितसंबंधांच्या प्रभावाखाली अर्थव्यवस्था उत्तरोत्तर दुबळी बनत गेली. नोकरशाहीचे स्वार्थी हितसंबंध व तिचा भ्रष्ट व्यवहार यांना आवर घालणे, तिला शिस्त लावणे अशक्यप्राय झाल्याचा अनुभव आपण वारंवार घेत असतो. अर्थव्यवस्थेची कार्यक्षमता, उत्पादकता, स्पर्धेत टिकण्याइतका चोखपणा, गुणवत्ता, शिस्त यांच्यात वाढ करण्यासाठी, तिची आवश्यक ती पुनर्रचना करण्यासाठी 'जागतिकीकरण' — 'उदारीकरण'चा बाह्य दबाव हा आवश्यकच होता व इष्टही आहे, ही तिसरी भूमिकाही घेता येण्यासारखी आहे.

'जागतिकीकरण' — 'उदारीकरण' ही आपणा सर्वांच्या कल्पनेतला लोकशाहीनिष्ठ व समाजवादी नवसमाज निर्माण करणे अशक्यच करून टाकणारी घडामोड आहे, आणि म्हणून ती उलटविलीच पाहिजे असे आपले मत आहे. नवसमाजनिर्मिती करण्याचा लोकांचा दृढ संकल्प असला, त्यासाठी आवश्यक व योग्य तो त्याग करण्याची, परिश्रम करण्याची, बुद्धी वेचण्याची लोकांची तयारी असेल तर 'जागतिकीकरण' — 'उदारीकरण'च्या झंझावातावरही मात करून नवसमाजनिर्मितीच्या दिशेने वाटचाल नेहमीच शक्य कोटीतली राहील असे माझे म्हणणे आहे. पण ज्या प्रकारची जीवनरीती व समाजव्यवस्था माणसातल्या माणूसपणाच्या विकासासाठी, बहरण्यासाठी उपकारक आहे त्यांची निर्मिती करणे हे 'जागतिकीकरण' — 'उदारीकरण'चे मूळात उद्दिष्टच नाही. ज्या आधुनिक पश्चिमी सभ्यतेचा ही घडामोड हा अद्ययावत आविष्कार आहे तिचे अधिष्ठान व तिचे लक्ष्य वेगळेच आहे. या कारणाने, स्वयंअनुशासनासाठी तसेच दुर्गुण व विकृती यांचे परिष्करण करण्यासाठी, आपण या बाह्य दबावाचा जरूर उपयोग करावा; त्याच वेळी, वैकल्पिक अर्थव्यवस्थेच्या उभारणीच्या दिशेने पावले टाकण्यास आरंभ करावा, अशी माझी भूमिका आहे.

आजचे व्यापक व मूलगामी आव्हान उपस्थित होणे अटळ होते. पश्चिमेतही अनेक विचारवंतांनी, समाजशास्त्रज्ञांनी, पर्यावरणीय दृष्टी असणाऱ्या अर्थशास्त्रज्ञांनी व कलावंत-साहित्यिकांनी हे सांगितले होते. आधुनिक पश्चिमी सभ्यतेतच विनाशाची बीजे त्यांना दिसत होती. मूळातच हात घालणारी त्यांची ही टीका समजून घेण्याचे महत्त्व आहे. यासाठी ज्या पश्चिम युरोपात ही आधुनिक सभ्यता उदय व उत्कर्ष पावली त्या पश्चिम युरोपच्या इतिहासात थोडे शिरले पाहिजे.

सोळाव्या शतकानंतरच्या गेल्या चारपाचशे वर्षांच्या कालखंडाचे वर्णन 'आधुनिकतेचे युग' असे सार्थपणे केले जाते. अलीकडच्या तीसचाळीस वर्षांमध्ये हे युग संपुष्टात येत असल्याबद्दल वेगवेगळ्या क्षेत्रांतील अधिकारी व जाणकार मंडळी सूचन करीत आहेत, युक्तिवाद समोर ठेवत आहेत. 'पोस्ट-मॉडर्न', 'पोस्ट-इंडस्ट्रियल' हे शब्दप्रयोग आज प्रतिष्ठित झाले आहेत. पर्यावरणीय ऱ्हास व असंतुलन यामुळे जीवसृष्टीचे स्वास्थ्यच नव्हे तर अस्तित्व धोक्यात आले असल्याचा इशारा

अनुक्रमणिका

जगभर आज शास्त्रज्ञ देत आहेत. तर 'आर्थिक विकास' हा 'चिरस्थायी' स्वरूपात साधण्यासाठी पाळावयाच्या पथ्यांविषयी अर्थशास्त्रज्ञ व राजकारणी यांच्यामध्ये जागतिक पातळीवर खल चालू आहे. भांडवली अर्थव्यवस्थेच्या मोकाट घोडदौडीला रान मोकळे मिळाल्यानंतर उलटच परिणाम घडलेला दिसत आहे. राष्ट्र-राज्यांची चौकटच ती बेमुर्वतपणे उखडत आहे असे नाही, तर जगभरच्या राष्ट्रीय समाजांचे राजकीय स्वास्थ्यच धोक्यात आणीत असल्याने, तिचे कालपर्यंतचे समर्थकही चिंताग्रस्त झालेले दिसत आहेत.

एक गोष्ट सूर्यप्रकाशापेक्षाही स्पष्ट व स्वच्छ आहे. यापुढच्या काळात अखिल मानवजातीचा साकल्याने विचार करणे ही आपली सर्वांची अनिवार्यता (necessity) आहे. कारण संकट समग्र मानवजातीसमोर उपस्थित आहे आणि मानवी सभ्यतेचे (civilisation) वळण ठळकपणे बदलण्याची गरज स्पष्ट आहे.

पश्चिमेने जी सभ्यता (Civilisation) आधुनिक कालखंडात जन्माला घातली आणि जोपासली तिचा मूलाधार एक विशिष्ट आशयाचा बुद्धिप्रामाण्यवाद — विवेकवाद, विज्ञानवाद (रॅशनलिझम-सायंटिसिझम) — हा होता. आपण असेही पाहिले की, आज आपणास परिचित असलेल्या लोकशाही, राष्ट्र-राज्ये, लिबरॅलिझमप्रणीत व्यक्तिवाद, साम्राज्यवाद, वसाहतवाद, राष्ट्रवाद या साऱ्या गोष्टी या आधुनिक कालखंडाच्या खास निर्मिती आहेत. तीच गोष्ट भौतिक व सामाजिक शास्त्रांची आहे. आजचा विज्ञान-तंत्रविज्ञानाधिष्ठित औद्योगिक-आर्थिक समाज ही त्याचीच निर्मिती आहे. मानवी स्वभावप्रकृती, मानवी जीवनाची सार्थकता (अभ्युदय व निःश्रेयस, दोन्ही अंगांनी) यांविषयीची एक विशिष्ट समज ही सर्व क्षेत्रांतील विचार व व्यवहार यांच्या बुडाशी आहे. ही पश्चिमी आधुनिक सभ्यता हेच, त्या सभ्यतेमधील अनेकानेक गंभीर उणिवा व विकृतींमुळे, एक जीवघेणे संकट म्हणून मानवजातीवर कोसळत आहे.

म्हणूनच, राष्ट्राची एकजूट व सामर्थ्य यांच्या आधारे 'जागतिकीकरण' — 'उदारीकरण' यांचा प्रतिवाद करण्याची निकड स्वीकारीत असतानाच, रूढ पश्चिमी जातकुळीच्या राष्ट्रवादाच्या जोपासनेची गोष्ट आपण करीत नाही याची चोख स्पष्टता आपल्या ठायी असली पाहिजे.

**युरोपीय पार्श्वभूमी, मध्ययुग ते आधुनिकतेचे युग**

युरोपच्या इतिहासात 'मध्ययुग' हा प्राचीन व आधुनिक युगांच्या मधला टप्पा म्हणून वेगळा केला जातो. याला अलीकडेपर्यंत 'दि डार्क एजीस' (The Dark Ages) असे म्हटले जायचे. ज्ञानाच्या कसोटीवर हे अंधःकाराने भरलेले तमोयुग होते असे आधुनिक ज्ञानविज्ञानाने 'प्रकाशमय' झालेल्या जगातल्या सुधारलेल्या-पुढारलेल्या प्रबुद्ध मंडळींना दिसले. या कालखंडात युरोप हे रोमन कॅथलिक चर्चच्या आधिपत्याखाली (Christendom) होते आणि जीवनाच्या सर्व अंगांवर, विचारांवर ख्रिश्चन धर्माचे म्हणजेच चर्चचे सर्वंकष नियमन/नियंत्रण होते. श्रद्धा हा जीवनाचा आधार होता आणि चर्चने घालून दिलेल्या यमनियमांच्या काचात सारी माणसे बंदिवान होती. मध्ययुगीन राज्ये ही शस्त्रबळावर उभारलेली व चालणारी राज्ये होती, आणि त्यांना अधिमान्यता देण्याचा एकमेव अधिकार चर्चला होता. जीवन समुदायनिष्ठ व परंपरानिष्ठ होते. जमीन हे अर्थोत्पादनाचे मुख्य संसाधन होते. तिचे स्वामित्व ज्यांच्या हाती होते ते, सैन्य बाळगणारे लहानमोठे सरदारही होते. खेडूत जनता ही केवळ काबाडकष्टाची धनी असलेली जनता होती, आणि अनेकानेक बंधनांनी जखडून टाकली गेलेली होती. कारागीर-व्यापारी या वर्गांना गौण स्थान होते, आणि त्यांच्यावरही राज्यसत्तेची व धर्मपीठाची नाना बंधने होती. ही सभ्यता, समाजव्यवस्था व संस्कृती अशी होती की, धर्म व राज्यसत्ता या क्षेत्रांतील श्रेष्ठीजन तेवढे मनःपूत वागायला स्वतंत्र होते; बाकी समाजात व्यक्ती स्वतंत्र नाहीत, बुद्धी चालवायला, स्वतंत्र विचार करायला मोकळ्या नाहीत, असे चित्र रंगविले गेले. यात तथ्यांश जरूरच होता; पण ते बरेच जास्त गडद काळे ('Dark') रंगविले गेले असल्याचे आज लक्षात आले आहे.

या रूढ चित्रणाच्या विरोधात आधुनिक युगाची व आधुनिकतेची व्याख्या आणि मांडणी दीर्घकाळपर्यंत केली गेली. सोळाव्या शतकापासूनचा युरोप हा ठळकपणे वेगळ्या वळणाचा आहे आणि या संपूर्ण पाचशे वर्षांच्या कालखंडाला उद्देशून 'आधुनिक युग' म्हणावयास चांगलाच आधार आहे यात शंका नाही. या आधुनिक युरोपच्या निर्मितीत रेनेसाँ (Renais-sance) या नावाने ओळखल्या जाणाऱ्या घडामोडीचा नक्कीच महत्त्वाचा वाटा राहिला. कॉन्स्टॅन्टिनोपलचा पाडाव होऊन तुर्की साम्राज्यसत्ता पूर्व युरोपात व पश्चिम आशियात प्रस्थापित झाल्यावर ख्रिश्चन संस्कृतीच्या त्या प्रगत व मुख्य केंद्रातील अनेक विद्वान, कलावंत, कारागीर इत्यादी पश्चिम युरोपात


अनुक्रमणिका

विखुरले. ग्रीक कला व विद्या (तत्त्वज्ञान, साहित्य आदि) यांचे 'पुनरुज्जीवन' पश्चिम युरोपमधील धनाढ्य मंडळींच्या आश्रयाने त्यांनी केले. मध्ययुगाच्या उत्तरार्धात युरोपात नवी व्यापारी नगरे-शहरे उत्कर्ष पावली होती आणि त्यांचा कारभार (चर्चच्या सर्वंकष नियंत्रणाच्या पासून सुटका करून घेऊन) बऱ्याच स्वायत्तपणे चालत असे. स्वार्थ, नफेखोरी यांना मुक्त वाव देणारी ही आर्थिक-राजकीय नीती होती असे स्थूलमानाने म्हणता येईल. ईश्वरी हेतू, आदेश, निःश्रेयसाविषयीच्या धार्मिक ख्रिश्चन कल्पना यांना बाजूला ठेवून मानवी वासनाविकार, महत्त्वाकांक्षा यांची पूर्ती करण्यास, वैयक्तिक वा कौटुंबिक यश, कीर्ती, प्रतिष्ठा, धन व सत्ता यांच्या परिभाषेत अभ्युदय साधण्याला प्राधान्य देणाऱ्या सभ्यतेचा उदय या काळात झाला. 'माणूस' केंद्रस्थानी आला, असा याचा अर्थ करून Renaissance Humanism असाही शब्दप्रयोग प्रचलित झालेला आपल्याला आढळतो. आधुनिक अनिर्बंध (Unfettered) व्यक्तिवादी सभ्यतेचाही उदय येथे आपणास आढळतो.

मध्ययुगाचा उत्तरार्ध हा खरे तर अनेक क्षेत्रांमधील मन्वंतरांच्या सुरुवातीच्या जोमदार बदलांचा व वाढीचा कालखंड आहे. या काळात औद्योगिक उत्पादनाची व व्यापाराची केंद्रे म्हणून नगरांची वाढ झाली. वेगवेगळ्या मालांसाठी मोठ्या प्रादेशिक बाजारपेठा अस्तित्वात आल्या. प्रदेशाधिष्ठित राज्यांचा उत्कर्ष होऊन वैभवशाली बनण्यासाठी, तसेच सत्ता विस्तारासाठी स्पर्धा त्यांच्यात याच काळात वाढत गेली. आर्थिक व्यवहारांची गुंतागुंत वाढली तसे पुढील काळातील भांडवली अर्थव्यवस्थेचे बीजारोपण झाल्याचेही कोठे कोठे आढळते. आधुनिक विज्ञानाचा उदय काही शतकानंतर व्हावयाचा होता. पण या कालखंडात शेती, उद्योग, वाहतूक, दळणवळण इत्यादी क्षेत्रांत, मागे वळून पाहता, आश्चर्य वाटावे अशी प्रगती तंत्रविज्ञानात सतत होत गेल्याचे आढळते. बव्हंशी स्थानिक गरजांच्या पूर्ततेसाठी उभारल्या जाणाऱ्या शेतीधिष्ठित स्थानिक अर्थव्यवस्थेच्या जागी विशेषीकृत शेती व औद्योगिक उत्पादन व व्यापार यांवर आधारित जागतिक अर्थव्यवस्था प्रस्थापित होण्याची सुरुवात या कालखंडात आढळते.

धन आणि सत्ता यांच्या संपादनावर, स्वतःच्या हाती दोन्ही गोष्टी अधिकाधिक प्रमाणात एकवटण्यावर शक्ती-बुद्धी खर्च करणारी सभ्यता यामधून आकारास येण्याची प्रक्रिया गतिमान झाली. याची लागण रोमन कॅथलिक चर्चलाही झाली. कॅथलिक चर्च ही त्या काळातली युरोपव्यापी केंद्रीभूत आर्थिक व राजकीय महासत्ताच होती. उच्चपदस्थ धर्मगुरू हे राजेशाही वैभवात राहात व राजे-उमराव मंडळींशी यांचे साटेलोटे असे. चर्चच्या धार्मिक व्यवहारांमध्ये सर्व थरांवर भ्रष्टाचार वाढत गेला. अर्थ-काम या पुरुषार्थांचे नैतिक नियमन करण्याचे, त्यांच्यावर नैतिक अंकुश ठेवण्याचे, प्रेम व निरलस सेवा ही ख्रिस्ताची शिकवण वैयक्तिक व सामूहिक जीवनात उतरविण्याचे ध्येय समाजात मूर्त करणारी संघटना असे चर्चचे स्वरूप राहिले नाही. सत्ता व संपत्ती यांच्यासाठी मूल्यविहीन स्वार्थी राजकारण करण्याचा चर्च ही अड्डाच बनली.

धार्मिक जीवनात पश्चिम युरोपात रोमन कॅथलिक चर्चची मक्तेदारीच होती. पश्चिम युरोपात अन्यधर्मीय समाज कोणतेच नव्हते. मुस्लिम समाजांचे अस्तित्व ख्रिश्चन धर्मपीठाला व ख्रिश्चन राज्यसत्तांना परिचित होते. पण 'ख्रिश्चनडम' मधून ते समाज बहिष्कृत होते. माणसाला तारण हवे असेल तर ख्रिश्चन जगतात व्यक्तीला चर्चला शरण येण्याखेरीज पर्याय नव्हता. उत्कट, प्रामाणिक, कडव्या भाविक ख्रिश्चनांची पण कोंडीच झाली होती. याविरुद्ध मार्टिन ल्यूथरने बंड पुकारले, आणि त्यामधून जी 'रेफर्मेशन' या नावाने ओळखली जाणारी धर्मक्रांती घडून आली तिच्या परिणामी रोमन कॅथलिक चर्चची मक्तेदारी मोडीत निघाली आणि आपल्या आपल्या स्वतंत्र धारणेनुसार ख्रिश्चनधर्मीय जीवन जगायला व्यक्ती व समविचारी समुदाय मोकळे झाले. धार्मिक श्रद्धा व जीवन या आत्मनिष्ठ गोष्टी ठरल्या. व्यक्तीला एक प्रकारे सार्वभौमत्व व स्वतोमूल्य प्राप्त झाले.

याच काळात राजकीय व आर्थिक उलाढालींचे वळण बदलत होते. प्रादेशिक व आंतरप्रादेशिक बाजारपेठा संघटित होत होत्या, व्यापार वाढत होता आणि राज्यांचे आकारमान व सत्ताही वाढत होती. अशा वेळी धर्मक्रांतीमुळे चर्चची समाजावरील पकड ढिली पडली. राजकीय व आर्थिक व्यवहार हे स्वायत्त झाले; धार्मिक-नैतिक बंधने व अंकुश यांच्यापासून त्यांची सुटका झाली. धार्मिक व इहलौकिक जीवन यांची फारकत झाली.

याच घडामोडींचा एक क्रांतिकारक परिणाम ज्ञान-विज्ञान या क्षेत्रांत झाला. सत्य काय, ज्ञान काय हे धर्मग्रंथात लिहून ठेवलेले असते, किंवा ईश्वराच्या वतीने धर्मुगरू, चर्च हे त्याचे प्रकटन करीत असतात वा अधिकृतपणे अर्थ विशद करीत असतात, ही भूमिका इहलौकिक क्षेत्रांमधील ज्ञानव्यवहारामध्ये,






सत्यासत्यविवेक, नीतिविवेक करण्याच्या संदर्भात गैरलागू ठरविण्यात आली. मानवाची स्वभावप्रकृती, त्याचे वर्तन यांचेही ज्ञान ऐंद्रिय संवेदनांच्या माध्यमातून, 'बुद्धी'च्या सहाय्याने होते अशी भूमिका घेतली गेली. 'एनलायटनमेंट'चे, विवेकवादाचे युग (Age of Reason) अवतरले असे याचे वर्णन केले जाते. आधुनिक विज्ञान हे या 'एज ऑफ रीझन'चे अपत्य आहे. 'श्रद्धे'ची, 'धर्मा'ची पिछेहाट आणि इहलौकिक जीवनातून ईश्वराची 'निवृत्ती' असे याचे वर्णन केले गेले आहे. ईश्वराला हटवून माणसाने स्वतःची प्रतिष्ठापना ईश्वराच्या जागी केली असे पण याचे वर्णन करता येण्यासारखे आहे. रेनेसाँप्रणीत मानवकेंद्री दृष्टीचे मर्म 'Man is the measure of all things' या वचनात साठवलेले आहे. माणूसच आता सर्वेसर्वा आहे; तो म्हणेल ती पूर्व दिशा.

### आधुनिक पश्चिमी सभ्यता

आधुनिकतेमधून आकारास आलेल्या सभ्यतेच्या गाभ्याशी असलेल्या काही गोष्टी लक्षात घेणे गरजेचे आहे. ही सभ्यता ज्ञानविज्ञानाधिष्ठित असल्याचा दावा करते, वैज्ञानिक रीतीने प्राप्त होणारे तेवढेच ज्ञान एकमेव चोख ज्ञान होय अशीही भूमिका घेते. 'वैज्ञानिक रीती'चीही एक विशिष्ट मांडणी केली गेली आहे. विश्वात जे काही घडते ते निरपवादपणे नियमांनुसारच घडते, आणि म्हणून एका अर्थी भूत-वर्तमान-भविष्य हे आधीच ठरेले आहे (predetermined). 'उत्क्रांतिवाद', 'इतिहासाची अटळ वाटचाल', 'प्रगती' ही पायाभूत गृहीततत्त्वे (axioms) आहेत. त्यांना विज्ञानाचा आधार असल्याचा दावा केला जातो. सर्व काही नियमांनुसार घडत असताना काही घटना अकल्पितपणे वेगळ्या घडणे हाही एक नियमच आहे. आणि यामुळे सृष्टी उत्क्रांत होत आली आहे. 'उत्क्रांती' हा शब्दच सांगतो की, या बदलांना एक दिशा आहे आणि ती अधिकाधिक उन्नतीकडे, प्रगतीकडे नेणारी दिशा आहे. जैविक अंगाने जशी उत्क्रांती होते तशी इतिहासाची वाटचाल सामाजिक अंगाने माणसाला व्यक्तिगत व सामूहिकरित्या अधिकाधिक उच्च व उन्नत अवस्थेप्रत नेत राहणार हा पण सृष्टीचा नियमच आहे.

'प्रबोधना'मागचे (एनलायटनमेंट) एक गृहीत असे होते की, ज्ञान माणसाचा परिपूर्ण विकास घडवून आणू शकते (perfectibility of man). हे ध्येय साध्य करता येण्यासारखे, माणसाच्या आवाक्यातले ध्येय आहे. आणि हे ध्येय इतिहासाच्या वाटचालीत उत्तरोत्तर अधिकाधिक साध्य होत जाणारच आहे. आज माणसे रानटी, असंस्कृत, अविवेकी व्यवहार करतात कारण ती कमीअधिक प्रमाणात अडाणी आहेत. ती जसजशी बुद्धिप्रामाण्यनिष्ठ, विज्ञाननिष्ठ, म्हणजेच प्रबुद्ध बनतील तसतशी त्यांची व्यक्तित्त्वे परिपूर्ण विकसित होत जाणार आहेत.

असे, आदर्शवत् उन्नत तत्त्वज्ञान अंगिकारलेले असताना, आणि त्यांच्या स्वतःच्याच मोजमापानुसार पश्चिम युरोपीय माणसे जगातील सर्वाधिक ज्ञानी, विकसित, प्रगल्भ-प्रबुद्ध व सुसंस्कृत असताना, याच पश्चिमी सभ्यतासंपन्न राष्ट्रांकडून, समाजांकडून जगातल्या 'मागास', 'अडाणी', 'अप्रबुद्ध' लोकांशी इतका अन्याय्य, लुटारूपणाचा कळस गाठणारा, क्रूर अमानुषता प्रकट करणारा व्यवहार संपूर्ण आधुनिक कालखंडभर कसा घडला?

अहंकेंद्री, स्वार्थी, सुखवृद्धीची अमर्याद इच्छा बाळगणारी, दुःख/वेदना टाळणारी व त्यासाठी अखंड व अथक धडपड करणारी, इतरांवर सत्ता गाजविण्याची कांक्षा बाळगणारी, जास्तीत जास्त सत्तावान बनू पाहणारी हीच मनुष्याची अपरिवर्तनीय व सनातन स्वभावप्रकृती होय, हे मानवासंबंधीचे विज्ञाननिष्ठ सत्य ज्ञान आहे ही धारणा खास आधुनिक धारणा आहे. आधुनिकता व्यक्तिवादी आहे. ती व्यक्तीलाच ओळखते. ही माणसाची अपरिवर्तनीय नैसर्गिक स्वभावप्रकृती असेल तर मग मानवी जीवनाचे साफल्य व सार्थकता, स्वतःच्या सुखोपभोगामध्ये सतत भर घालण्यासाठी कार्यरत असण्यात, स्वतःची सत्ता विस्तारत व मजबूत करीत राहण्यात, आणि अहंची पुष्टी (यश, कीर्ती, प्रतिष्ठा या अंगांनी) साधण्यात असू शकते. मग, माणसे समाज करून का राहतात? समाजसंघटन का करतात? असे प्रश्न उपस्थित होतात. स्वतःचा स्वार्थी अभ्युदय सुरक्षितपणे, खात्रीलायकरित्या व भरीव स्वरूपात साधण्यासाठी इतर व्यक्तींशी करार करून समाज म्हणून संघटित होणे उपयोगाचे व सोयीचे, म्हणजे स्वार्थसाधनेशी संवादी आहे म्हणून, असे याचे उत्तर येते.

रेनेसाँनंतरचे मानवकेंद्री, 'मानवच सगळ्या गोष्टींचे मोजमाप', या सूत्राभोवती उभारलेले व्यक्तिवादी जग हे, एका अंगाने, माणसाच्या मनाची क्षितिजे विशाल करणारे व त्याची उंची वाढविणारे नक्कीच होते. 'प्रबोधना' (एनलायटनमेंट) च्या विचारव्यूहात पृथ्वीवरच्या सर्व मानवसमूहांचे माणूसपण स्वीकारले गेले, आणि भविष्यात कधी काळी सर्व माणसे प्रबुद्ध होणारच


अनुक्रमणिका

होणार हे आश्वासन दिले गेले. व्यक्तिस्वातंत्र्य व समान दर्जा ही मूल्येही पायाभूत मूल्ये म्हणून मान्यता पावली. पण, दुसऱ्या अंगाने, स्वार्थप्रेरित, निर्घृण, स्पर्धात्मक, कलहपूर्ण व्यवहाराला मानवी स्वभावप्रकृतीचा आधार दिला गेला. एवढेच नाही तर, स्पर्धा व जीवघेणा कलह यांच्या माध्यमातून व्यक्तीचे व समाजाचे आणि पर्यायाने मानवजातीचे पाऊल पुढे पडते, असाही बोध काढण्यात येऊन जीवघेण्या स्पर्धा-कलहास, शोषण-पिळवणुकीस, लुटारूपणास व नरसंहारास नैतिक प्रामाण्य व समर्थनही दिले गेले. आधुनिक युगाच्या आरंभी पोर्तुगाल व स्पेन यांनी पादाक्रांत करण्यासाठी जग आपसात वाटून घेतले. आपण ख्रिश्चन सत्ता आहोत याचा त्यांना गर्व होता. आपले राज्य प्रस्थापित होईल तेथील लोकांना ख्रिश्चन धर्माची दीक्षा द्यावयाची, हे त्यांचे धोरण होते. या सरळ सरळ, लिबरल नसलेल्या प्रतिगामी (illiberal) राज्यसत्ता म्हणून युरोपातही गणल्या गेल्या. त्यांची अशी संभावना करणाऱ्या लिबरल, प्रागतिक, प्रबुद्ध युरोपीय राज्यसत्तांची साम्राज्यवादी कारकीर्द कमी रानटी वा असंस्कृत, कमी लोभी, लुटारू राहिली नाही असे पुढील काळातील इतिहास सांगतो. उलट, आम्ही साम्राज्ये प्रस्थापित करीत आहोत ती वस्तुतः आमचा स्वार्थ साधण्यासाठी नसून, जगभरच्या असंस्कृत व अप्रबुद्ध लोकांना खऱ्या तारणहार धर्माची शिकवण देण्याचा, त्यांना शिक्षित करण्याचा, सभ्यतेच्या पायरीपर्यंत त्यांचा उद्धार करण्याचा वसा-भार आमच्या खांद्यावर आम्ही घेतला आहे हा, विशेषतः, लिबरल साम्राज्यसत्तांचा दावा होता.

### आधुनिक पश्चिमी सभ्यतेची मूलगामी चिकित्साः मार्क्स व गांधी

पश्चिमेमध्ये ही जी नवी आधुनिक सभ्यता उत्कर्ष पावली तिच्या व्यवहाराने, व तिच्या प्रवक्त्यांनी तिच्या केलेल्या सैद्धांतिक व नैतिक समर्थनाने, व्यथित व सात्त्विक संतापाने पेटून उठणारी मंडळी पश्चिमेमध्ये आढळून येणे स्वाभाविक होते. अठराव्या-एकोणिसाव्या शतकात आधुनिक सभ्यतेचा प्रकर्ष झाला तेव्हा वेगवेगळ्या भूमिकांमधून याचा प्रतिवाद झाला. समाजवाद साम्यवाद, सहकार या विचारप्रणालींचे उदाहरण घेता येईल. विल्यम ब्लेक, विल्यम मॉरिस, जॉन रस्किन, टॉलस्टॉय, अशी काही नावे आपणास परिचित आहेत. महात्मा जोतिबा फुले आणि रवींद्रनाथ टागोर ही उदाहरणे आपल्या दृष्टीने पुष्कळ अधिक महत्त्वाची आहेत.

एकोणिसाव्या शतकातील मार्क्स आणि विसाव्या शतकातील गांधी या दोन व्यक्ती विशेष महत्त्व राखतात. कार्ल मार्क्स तत्त्वज्ञान या विषयाचा विद्यार्थी. हेगेल या तत्त्वज्ञाच्या प्रभावाखाली काही काळ मार्क्स होता. रेनेसाँ, रेफर्मेशन, एनलायटनमेंट या घडामोडी, तसेच आधुनिक विज्ञान व सामाजिक शास्त्रे, लोकशाही, राष्ट्रवाद, भांडवली अर्थव्यवस्था, तंत्रविज्ञाना-तील अद्ययावत प्रगती, युरोपातील राज्यक्रांत्यांची घडामोड, युरोपची इतिहास-परंपरा यांचा मार्क्सचा गाढ व्यासंग होता. माणसांचे जे रोजचे जगणे आहे त्याला आकार देणारे आर्थिक-राजकीय व्यवहार यांचे मध्यवर्ती महत्त्व त्याने जाणले. 'सगळ्याच्या गाभ्याशी असलेल्या' आर्थिक व्यवहारांवर त्याने ध्यान केंद्रित केले तेव्हा त्याला ज्या सत्याचा साक्षात्कार झाला ते सत्य कोणते होते? माणसाचे माणूसपणच पद्धतशीरपणे खच्ची करणारी, त्याच्या स्वतःच्या माणूसपणालाच त्याला पारखे करून टाकणारी नवी जोमदार अर्थव्यवस्था उत्कर्ष पावत असलेली त्याने पाहिली. नव्या प्रकारच्या यंत्राधारित कारखानदारी उत्पादनव्यवस्थेत कामगार म्हणून स्वतःची श्रमशक्ती विकून उपजीविका हस्तगत करण्याखेरीज गत्यंतर नसलेल्या समाज-घटकावर मार्क्सने त्याचे ध्यान केंद्रित केले.

'एनलायटनमेंट', 'एज ऑफ रीझन', 'आधुनिक विज्ञान' यांचेच मार्क्स अपत्य होता व राहिला. याचा एक भाग म्हणून इतिहासाची वाटचाल काही नियमांनुसार होते, समाजात मन्वंतर नियमांनुसारच घडून येते, आणि ही वाटचाल प्रगती, उन्नयन व मुक्ती या दिशेने होते हे मार्क्सच्या भूमिकेत गृहीतच होते. १८४८ च्या वर्षी युरोपात कोठे कोठे राज्यक्रांतीच्या स्वरूपाचे उठाव झाले, पण मार्क्स-एंगल्सना अभिप्रेत असलेली कम्युनिस्ट क्रांती कोठेच घडून आली नाही. त्यानंतरच्या काळात साम्यवादी राज्यसत्तेची/समाजाची प्रस्थापना कधी होईल व कशी होईल याचे नियम, टप्पे इ. 'वैज्ञानिक तर्का'ने निर्धारित करण्यात त्याने मुख्यत्वेकरून स्वतःचे आयुष्य वेचले.

मार्क्सने मानवी स्वभावप्रकृती, निसर्गसृष्टी व माणूस यांचा संबंध, माणसाच्या माणूसपणाचे मर्म, स्वरूप व सार्थकत्व याविषयी क्रांतदर्शी असे तत्त्वचिंतन आयुष्याच्या पूर्वार्धातच केले. स्वतःच्या माणूसपणाला पारखे व्हावे लागू नये, उलट स्वतःचे माणूसपण सर्वांगांनी बहरून येईल अशा प्रकारचे त्याचे नाते स्वतःशी, इतरांशी व निसर्गसृष्टीशी त्याच्या जगण्यामधून जडून यावे; हे नाते शासन-शोषणमुक्त, समत्वपूर्ण व बंधुभावाचे,

पारस्पारिकतेचे असावे अशी त्याची जीवनविषयक दृष्टी होती. या भूमिकेमधून केवळ भांडवली अर्थव्यवस्थाच त्याने नाकारली नाही तर, ज्यांचा तो superstructure मध्ये समावेश करतो त्या संस्था, व्यवस्था, शास्त्रे, तत्त्वज्ञान, धर्म इत्यादी गोष्टीही भ्रमात्मक व भ्रम पैदा करणाऱ्या म्हणून त्याने अव्हेरल्या.

विसाव्या शतकात, मार्क्ससारखेच मूळापर्यंत जाणारे, आधुनिक पश्चिमी सभ्यतेचे भेदक व सर्वस्पर्शी खंडन गांधींनी केले, आणि तिचा अव्हेर केला. *हिंद स्वराज्य* ही त्यांच्या भूमिकेची साररूपाने पहिली ठळक मांडणी आहे. तिचे तपशीलवार विवरण त्यांच्या आयुष्यभरातल्या जीवनकार्य व लेखन यांच्यामध्ये आढळते. आधुनिक पश्चिमी सभ्यता, विशेषतः तिचा इंग्लिश आविष्कार, हा सुसंस्कृततेचा सर्वोच्च आदर्श होय ही धारणा बाळगून गांधी इंग्लंडला बॅरिस्टर बनायला गेले. तेथील सभ्यतेचा (civilisation) वेगवेगळ्या संदर्भांमध्ये, वर्तुळांमध्ये व परिस्थितीमध्ये प्रत्यक्ष अनुभव घेतल्यावर, ती आत्मसात करण्याचा तारुण्यसुलभ प्रयत्न केल्यावर त्यांच्या मनाला काही प्रश्न पडले. योगायोगाने, शाकाहारीच राहण्याच्या त्यांच्या निर्धारामुळे ते तत्कालीन पश्चिमी सभ्यतेला वेगवेगळ्या अंगानी नाकारणाऱ्या, वेगळी जीवनदृष्टी व जीवनशैली अंगीकारलेल्या इंग्लंडमधील बंडखोर वर्तुळात दाखल झाले. दक्षिण आफ्रिकेतील गौरवर्णियांच्या आर्थिक-राजकीय व्यवहारांमुळे, वर्णभेद, वंशश्रेष्ठत्वाचा अहंकार, हिंस्रता आणि या सगळ्याचे इंग्लंडमधील प्रबुद्ध राज्यकर्त्यांकडून केले गेलेले समर्थन या सगळ्याच्या अनुभवाने पश्चिमी सभ्यता ही 'सैतानी सभ्यता' असल्याचा त्यांचा ठाम अभिप्राय बनला. नैतिकतेच्या कसोटीवरच कोणत्याही सभ्यता व संस्कृती यांची उंची मोजली जायला हवी; भौतिक समृद्धी, सुखोपभोगांची रेलचेल, औद्योगीकरण, यंत्रांचा वापर यांसरख्या गोष्टींवरून नाही; हा निवाडा *हिंद स्वराज्य* मध्ये त्यांनी ठासून मांडला.

ऐहिकदृष्ट्या माणसांना त्यांच्या पायाभूत गरजा भागविता येतील असे सुखासमाधानाचे जीवनमान लाभावे, आणि त्यासाठी आवश्यक असा, मानवीय सन्मान राखला जाईल असा रोजगार मिळावा हा प्रत्येक माणसाचा जन्मसिद्ध हक्क आहे; पण हा हक्क त्याने समाजातील शेजारी बांधवांच्या संबंधातील स्वतःची कर्तव्ये पार पाडण्यातूनच संपादित करावयाचा असतो, असे त्यांचे प्रतिपादन होते. सर्वांनी कष्टकरी व्हावे आणि उच्चनीच भेदभाव टाकून देऊन सर्वांशी बंधुभावाने वर्तावे, त्या मार्गाने समाज 'एकमय' बनावा ही महात्मा जोतीबा फुले यांची शिकवण गांधींनी शंभर टक्के आपली केली होती. ही शिकवण टॉलस्टॉय व रस्किन यांच्या लेखनातून त्यांनी आत्मसात केली होती, हा योगायोगाचा भाग होय. साध्य-साधन विवेक हा गांधींच्या विचाराचा दुसरा विशेष होय. यातूनच त्यांचा अहिंसेचा व सत्याग्रहाचा विचार आकारास आला. मनुष्यजीवनाचे साफल्य व सार्थक कशात आहे या प्रश्नाचे उत्तर, भगवद्‌गीतेपासून काढलेले 'अनासक्तीयोग' हे त्यांनीच काढलेले सार आणि येशू ख्रिस्ताच्या 'डोंगरावरील प्रवचन' (Sermon on the Mount) ची शिकवण यांच्या आधारे त्यांनी दिले. गौतम बुद्धाच्या शिकवणीच्या व आचाराच्या ते पुष्कळ जवळ येते.

**'जागतिकीकरण' — 'उदारीकरण'च्या विरोधाचे अधिष्ठान**

आधुनिकतेची ऐतिहासिक पार्श्वभूमी, आधुनिक पश्चिमी सभ्यतेचा आशय/घाट, आणि त्या सभ्यतेचा अव्हेर करणाऱ्या मार्क्स व गांधी यांच्या भूमिका पाहिल्यावर आपण 'जागतिकीकरण' आणि 'उदारीकरण' यांचा प्रतिवाद करण्याच्या मुद्याकडे पुन्हा येऊ. आपण असे पाहिले की, राष्ट्र-राज्यात्मक रचना असलेल्या जगात आपण राहात असल्याने, प्रतिवाद यशस्वीपणे करता येण्यासाठी राष्ट्र म्हणून भारताला समर्थपणे उभे राहावयास हवे. जागतिक अर्थव्यवस्थेमध्ये आज आपण एक घटक-अर्थव्यवस्था म्हणून सहभागी आहोतच. तिच्यावर अवलंबून पण आहोत. पण तेवढे एकच दुबळेपण नाही. राजकीय स्वातंत्र्य मिळाले तेव्हा आपला समाज जास्त एकात्म होता. आज तो मनाने अधिक चिरफाळलेला, कलहग्रस्त व 'आपला एक समाज तर राहो, एक राष्ट्र पण नाही' असे म्हणण्यात धन्यता मानणारा आहे. देशाला मजबुती प्राप्त करून देणारे एकराष्ट्रीयत्व निर्माण करणे, ते निर्माण करणारा 'राष्ट्रवाद' जोपासणे आणि समर्थ एकजुटीने देशाला नेतृत्व देणे ही पायाभूत गरज आहे. तरच जागतिक अर्थव्यवस्थेत किमान आवश्यक तेवढ्या प्रमाणात सहभागी राहूनही आपण दुबळ्या, परावलंबी मानसातून मुक्तता मिळवू शकू.

आपण असेही पाहिले की, आजचे 'जागतिकीकरण' — 'उदारीकरण' ही एका दिशेने गेली चारपाच शतके चालू असलेल्या आधुनिक पश्चिमी सभ्यतेच्या वाटचालीची परिणती आहे. त्या सभ्यतेचीच एका विशिष्ट जातकुळीचा राष्ट्रवाद ही एक निर्मिती आहे. तेव्हा, एकविसाव्या शतकातील आपल्या

राष्ट्रवादाचा आशय व घाट आधुनिक पश्चिमी सभ्यतेचा योग्य व आवश्यक तेथे अव्हेर करणारा, व या सभ्यतेमधील उणिवा व विकृती दूर करण्याची क्षमता असलेला असावा लागेल. येथे आपणास या सभ्यतेचे मार्मिक खंडन केलेल्या मार्क्स, गांधी यांचा तसेच अन्य समानधर्मीय विचारवंत-कलावंत-शास्त्रज्ञ यांचा आधार घ्यायला हवा.

'जागतिकीकरण' — 'उदारीकरण' यांना आपला विरोध नेमका कोणत्या कारणांसाठी आहे वा असायला हवा? पृथ्वीवर अनेकानेक जनसमूह आपल्या आपल्या स्थानिक पर्यावरणीय व्यवस्थेत व निवासक्षेत्रात राहत होते. त्यांना स्वतःची ओळख होती. इतर जनसमूहांच्या अस्तित्वाचे भानही होते. त्यांच्याशी कधी मैत्रीपूर्ण तर कधी शत्रुत्वाचा संबंधही होता. पण असे सर्व जनसमूह जीमध्ये समाविष्ट आहेत अशा 'अखिल मानवजाती'ची संकल्पना उदय पावली नव्हती असा एक काळ होता. आजही पृथ्वीवर असे अनेक जनसमूह आहेत जे त्यांच्या त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण जीवनशैली व संस्कृतींसह त्यांच्या त्यांच्या ठिकाणी अर्थपूर्ण जीवन जगत आहेत, पण 'अखिल मानवजात' हा त्यांच्या मनोविश्वाचा भाग नाही. आपल्या जमातीचे नाहीत या अर्थाने जे परके आहेत तेही, उच्चतर पातळीवर, मानव या नात्याने 'स्वजन'च आहेत, ही कल्पना त्यांच्या जीवनदृष्टीचा भाग नाही. 'जागतिकीकरणा'ला विरोध करण्यामागे, पुन्हा एकवार, मानवजातीने मागे जाऊन त्या अवस्थेत, त्या टप्प्यावर जगावे असे आपले म्हणणे नाही. जगभरच्या मानवसमूहांचे एकत्व, त्यांची मिळून बनणारी मानवजात (Mankind) आणि एक जग (One World) या गोष्टी आपणास हव्याच आहेत. म्हणजेच, आपला जागतिकीकरणाला विरोध असू शकत नाही; कोणत्या जातकुळीचे जागतिकीकरण आपणास योग्य, उपकारक व इष्ट वाटते हे स्पष्ट करण्याचे आव्हान आपल्यासमोर उपस्थित आहे.

'उदारीकरण'ची गोष्टही अशीच आहे. अर्थव्यवस्थेचे सर्वंकष नियंत्रण एका केंद्रीभूत राजकीय सत्ताकेंद्राच्या हाती नसावे, व्यक्तींचा वा व्यक्तीसमूहांचा अभिक्रम, त्यांचे निर्णय व कृतिस्वातंत्र्य यांना मारक अशा निर्बंधांनी आर्थिक व्यवहार जखडले जाऊ नयेत या भूमिकेलाच आपला विरोध आहे का? राजकीय, आर्थिक, बौद्धिक सर्व व्यवहारांचे 'राष्ट्रीयीकरण' (nationalisation) वा सामूहिकीकरण (collect-ivisation) — व्यवहारात सर्वंकष सरकारीकरण — करण्याचे धोरण साम्यवादी राज्यसत्तांखाली राहिले. यातली अमानुषता मानवजातीने अनुभवली आहे. म्हणजे, 'उदारीकरणा'च्या विषयातही, योग्य, उपकारक व इष्ट असे उदारीकरण कोणत्या जातकुळीचे असेल यावरूनच वाद आहे असे म्हणावयास हवे.

मानवेतिहासात आपण ज्या टप्प्यावर येऊन पोचलो आहोत त्या टप्प्यावरचे या संदर्भातले कळीचे मुद्दे कोणते यावर ध्यान केंद्रित करावयास हवे आहे. काही मुद्दे सनातन आहेत. ते कोणते? अगदी लहान लोकसंख्या असलेली कोणतीही आदिवासी जमात घेतली तरी, भिन्न स्वभावप्रकृतीच्या व्यक्तींच्या मिळून बनणाऱ्या जमातीचे एकत्व कसे टिकवून धरावयाचे, संवर्धित करावयाचे या प्रश्नाला त्या जमातीला पूर्वापार सामोरे जावे लागलेले आहे असे आढळते. कोंबडी आधी की अंडे आधी, हा प्रश्नच चुकीचा आहे; समूहाच्या, समष्टीच्या सातत्यपूर्ण अस्तित्वाखेरीज व्यक्ती व्यक्तित्त्वाने संपन्न बनू शकत नाही; त्याच वेळी, व्यक्तित्वसंपन्न अशा भिन्न स्वभावप्रकृतीच्या व्यक्तींच्या एकत्र येण्यामधूनच समष्टी अर्थपूर्णरित्या अस्तित्वात येते व येऊ शकते. आपण ज्या विचारव्यूह-संरचना-व्यवस्था याला उद्देशून धर्म हा शब्द वापरतो त्याची निर्मिती ही व्यक्ती व समष्टी या दोहोंच्या धारणेसाठी आणि स्वास्थ्यासाठी अत्यावश्यक, अनिवार्य असल्याचे शहाणपण माणसाला अनुभवाने फार प्राचीन काळीच प्राप्त झाले.

असाच दुसरा कळीचा मुद्दा 'सुष्ट' व 'दुष्ट' प्रवृत्ती व शक्ती यांच्यातील अखंडपणे चालणाऱ्या व कधी न संपणाऱ्या युद्धाचा आहे. आधुनिक मानसशास्त्राने प्रत्येक माणसाच्या ठायी आढळणाऱ्या 'उपजत प्रेरणां' (instincts) ची गोष्ट केली. भारतीय परंपरेत वासना-विकारांची गोष्ट केलेली आहे, शरीर व मन यांच्या धर्मांची गोष्ट केलेली आहे. अनिवार्य 'भुकां'ची गोष्टही आपण करतो. काम, क्रोध, लोभ, मोह, मद व मत्सर या विकारांना आपल्या परंपरेत षड्रिपू मानलेले आहे. सद्गुण-दुर्गुण, सज्जन-दुर्जन, सत्प्रवृत्ती-दुष्प्रवृत्ती, vir-tues-vices, असे भेद आपण करतो. असा भेद करण्याचा आधार कोणता? व्यक्ती व समष्टी, दोघांच्याही विनाशाला आमंत्रण देतात त्या दुष्प्रवृत्ती, ते दुर्गुण, तसे वागणारे ते दुर्जन, दुष्ट असे आपण म्हणतो, असे लक्षात येईल. थोड्या बारकाव्यात गेल्यास आपल्या प्रत्येकाच्या ध्यानात ही गोष्ट येते, की केवळ स्वतःच्या कामना, आकांक्षा, स्वार्थ यांच्याच मागे माणूस लागतो, कोणतीही मर्यादा न पाळता लागतो तेव्हा,






अंतिमतः, माणूस स्वतःचा विनाश घडवून आणतो. कारण, जे इतरेजन असतात त्यांच्याबरोबर असणाऱ्या त्यांच्या ऋणानुबंधांच्य आधारावर माणूस त्याच्या अस्तित्वासाठी अवलंबून असतो.

माणसाचा अनुभव असा की, वासना-विकारांप्रमाणे, मी व माझे या अहंवृत्तीच्या जोडीला माणसात एक सदसद्विवेक-बुद्धीही असते. स्वार्थी वृत्तीच्या जोडीला निःस्वार्थी वृत्ती पण असते. पण वैयक्तिक व समूहजीवनात अहंपणाचा, स्वार्थाचा, आपल्या समूहापुरतेच पाहण्याचा, दुसऱ्याचे काढून स्वतःच्या मालकीचे करण्याच्या वृत्तीचा परिपोष अधिक सहजपणे होतो. 'मी व माझे' या अहंपणाचा लोप घडवून आणण्यासाठी, विकारांवर जय मिळविता येण्यासाठी इतरेजनांशी असलेले एकत्व हे अतींद्रिय पण सत्य म्हणून माझ्या अनुभवाला यावे लागते. हा प्रत्यय देणे, एकत्व हे उच्चतर वा अधिक शाश्वत, पायाभूत सत्य म्हणून माणसांच्या मनोधारणेत रुजवणे हे धर्माचे एक प्रयोजन राहिले आहे. आत्मौपम्यबुद्धी, सर्वभूतहितरती हा मानवीय धर्माचा गाभा आहे.

'जागतिकीकरण' — 'उदारीकरण' यांना या अर्थाने धर्माचे भक्कम अधिष्ठान असावे ही आजची निकड आहे. आधुनिक पश्चिमी सभ्यता ज्या तात्त्विक बैठकीवर उभारलेली आहे ती बैठक व्यक्तिगत व राष्ट्रीय-सामूहिक 'उन्नत स्वार्था'ची (enlightened self-interest) आहे. त्यातल्या त्यात, त्याहून उन्नत भूमिका प्रगल्भ उपयुक्ततावादी नीतिविचाराची, जॉन रॉल्स यांनी प्रतिपादिलेल्या 'न्याय' विचाराची म्हणता येईल. पारंपरिक परिभाषेत ही गोष्ट मांडावयाची तर, अर्थ-काम या दोन पुरुषार्थांच्याच आधारावर व्यक्तिगत व सामाजिक जीवनाची उभारणी करण्याच्या मर्यादेतच विचार होतो.

मानवी स्वभावप्रकृती, मानवी जीवनाचे साफल्य व सार्थक या विषयांच्या गुणात्मकदृष्ट्या वेगळ्या धारणांच्या आधारे नव्या मानवी सभ्यतेच्या उभारणीची कल्पना आपण केल्याखेरीज वेगळ्या जातकुळीच्या 'जागतिकीकरण' — 'उदारीकरणा'ची गोष्ट आपण करू शकत नाही. आचार्य विनोबा भावे यांनी विज्ञानाचे मनमोकळे स्वागत करताना असे म्हटले की, उद्याच्या जगात विज्ञान आणि अध्यात्म यांचा संयोग घडून यायला हवाय. तसा तो घडून येणार आहे असे त्यांचे भविष्याविषयीचे दर्शन होते. चराचरसृष्टीशी एकत्वाची अनुभूती या मानवी आत्मप्रत्ययात्मक सत्यावर अधिष्ठित नीतीविचार (ज्याच्या गाभ्याशी सर्वांविषयीची आत्मौपम्यबुद्धी आणि सर्वभूतहितरती या दोन गोष्टी असतील) असा अध्यात्म याचा अर्थ करता येईल.

**पर्यावरणीय दृष्टी व पर्यायी विकासनीती**

पर्यावरणाचा ऱ्हास व नाना प्रकारचे असंतुलन, आणि या पार्श्वभूमीवर आर्थिक विकासाचे वळण मूलतः बदलण्याची उपस्थित झालेली निकड या विषयाच्या अनुषंगाने आपण वरील मुद्दा स्पष्ट करून घेण्याचा प्रयत्न करूया. सुखोपभोगांचे मान कोणतीही मर्यादा न मानता आपण निरंतर वाढवत जाऊ शकतो कारण आधुनिक विज्ञान-तंत्रज्ञान नावाची जादुई शक्ती आपल्या हाती आली आहे, आणि प्रतिसृष्टी निर्माण करण्याची क्षमता मानवाने हस्तगत केली आहे, हे अलीकडच्या काळातले गृहीतक होते. १९७० पर्यंतच्या सुमारास पर्यावरणीय ऱ्हास व असंतुलन यांचे मानवी जीवनावरील विघातक परिणाम, नोंद घ्यायलाच पाहिजेत इतके गंभीर असल्याचे मान्य करण्याखेरीज गत्यंतर उरले नाही. १९७२ साली स्टॉकहोम (स्वीडन) येथे जागतिक पर्यावरण परिषद भरली आणि तिच्यात अनेक राष्ट्रांच्या प्रमुखांचा (पंतप्रधान वा अध्यक्ष) सहभाग होता. त्यानंतरच्या काळात 'स्वास्थ्यपूर्ण चिरस्थायी विकास' ('Wholesome, sustainable development') ही संकल्पना उत्तरोत्तर शिष्टमान्यता प्राप्त करीत गेली. १९९२ साली रिओ-द-जानेरो (ब्राझील) येथे पुन्हा जागतिक पर्यावरण परिषद भरली तिच्यात दीडशेहून अधिक राष्ट्रांचे प्रमुख सहभागी झाले. हे शिष्टमान्यतेचे गमक म्हणता येईल.

गांधींचे एक वचन या अर्थाचे आहे, की पृथ्वीवरच्या सर्व मानवांच्या पायाभूत गरजा भागविण्याची क्षमता पृथ्वीमातेपाशी आहे पण एकाची पण अमर्याद हाव ती पुरी करू शकणार नाही. या वचनाचा अर्थ आज नीट जाणून घेतला तर हे वचन आपणास काय सांगते? एक, आपल्या अमुक-तमुक गरजा आहेत आणि त्या भागल्याशिवाय आपणास सुखी-समाधानी जगता येणार नाही असे माणसाला वाटते. पण मनाचे चोचले वा त्याची हाव वा त्याला जडलेले व्यसन आणि त्याच्या गरजा यांच्यामध्ये त्याने फरक करणे आवश्यक आहे. दोन, व्यसन, हाव, चोचले या गोष्टी स्वभावतःच अशा आहेत की त्यांचे समाधान केले जाऊ शकत नाही. कारण मनोविकृती वा रोग यांच्या निदर्शक अशा त्या गोष्टी आहेत. तिसरी गोष्ट अशी की, 'गरजा' वाढवत जाणे आणि त्यांची पूर्तता करण्यासाठी

विविध प्रकारच्या संसाधनांचा व्यय करीत राहणे, ही विनाशाला आमंत्रण देणारी गोष्ट आहे. मानवी जीवनाचे, मनुष्यपणाचे साफल्य हे सत्य, शिव व सुंदर यांची उपासना करण्यात आहे. वरील उद्‌गारांच्या पाठीशी गांधींच्या मनात आणखी एक विचार होता असे मागे वळून पाहता म्हणता येते. माणसाच्या पायाभूत गरजा कोणत्या व किती हे ठरवावयाच्या वेळी एक पथ्य सांभाळावे असे गांधी आग्रहाने म्हणत. ते हे की, हे जीवनमान प्रत्येक माणसास उपलब्ध करून देण्याचे कर्तव्य समाजधुरीणांनी आपले मानले पाहिजे.

आता, १९९२ च्या जागतिक पर्यावरण परिषदेनंतरच्या दहा वर्षांचा अनुभव काय आहे? जगातील सधन राष्ट्रे, त्यांच्या सधनतेच्या प्रमाणात पर्यावरणाचा ऱ्हास थांबवून अधिक उपकारक व शुभप्रद पातळीवर संतुलन निर्माण करण्याचे कर्तव्य पार पाडण्यास अजिबातच तयार नाहीत. (जगातल्या सामान्य गोरगरीब बहुसंख्यांक जनांच्या तुलनेत) संसाधनांच्या उधळपट्टीवर व स्वतःचा थाटमाट प्रदर्शित करण्यावर उभारलेली, फाजील सुखोपभोगी अशी त्यांच्या मध्यमवर्गीय, उच्चवर्गीय व श्रीमंत मंडळींची राहणी कमी करण्याचा विचार ते करूच शकत नाहीत, हे त्यांनी सरळसरळ जाहीरच केले आहे. इतकेच नाही तर, जीवनमान अधिक श्रीमंती बनवीत नेणारा आर्थिक विकास करीत राहणे हे उद्दिष्ट सोडण्याचाही विचार ते करू शकणार नाहीत. त्यांचा भरवसा दोन गोष्टींवर असल्याचे आढळते. एक, अविकसित व विकसनशील देश वेगवेगळ्या कारणांनी दुबळे व परावलंबी असल्याने, अगदी तातडी असलेल्या काही बाबींच्या संबंधांत स्वतःचा आर्थिक विकास मंदावण्याची किंमत देऊन पर्यावरणीय समतोल राखण्यासाठी त्यांचा होकार प्राप्त करता येईल; नव्हे, गरज पडल्यास त्यांना भाग पाडता येईल. दुसरे, विज्ञान-तंत्रज्ञान आपल्या मदतीला येईल आणि आपल्याला कशाचाही त्याग करावा न लागता पर्यावरणीय ऱ्हास व असंतुलनाची समस्या सोडवून आपण आणखी आणखी आर्थिक विकास करण्यास मोकळे राहू, तसेच आपले अग्रेसरत्व, प्रभुत्व व सधनतेच्या पातळीतले उच्चत्व कायम टिकवून धरू शकू असा भरंवसा ते बाळगून आहेत.

'जागतिकीकरण' — 'उदारीकरण'चे प्रवर्तक व प्रवक्ते आज कशाची मागणी करीत आहेत? कशासाठी दबाव टाकीत आहेत? भांडवल व विज्ञान-तंत्रविज्ञान यांची गुंतवणूक करून वस्तू व सेवा यांचे उत्पादन व विक्री यांद्वारा नफा कमाविता येण्याच्या आणि आमच्या सुखोपभोगात, संपत्तीत, व सत्तेमध्ये भर टाकण्याच्या संधींचा लाभ घेण्याच्या आड कोणी येता कामा नये; जंगल, जमीन, पाणी, खनिजे इत्यादी संसाधने आम्हाला हवी तेव्हा व तेवढी हस्तगत करता आली पाहिजेत; आम्ही उत्पादन करू त्या वस्तू व सेवा यांच्यासाठी आमच्या सोयीगरजेनुसार बाजारपेठा खुल्या राहिल्या पाहिजेत; इतकेच नाही तर, जगभरची माणसे ही पण संसाधने म्हणून आम्हाला (सेवक, ग्राहक, कामगार अशा विविध भूमिकांमध्ये) उपलब्ध असली पाहिजेत. त्यांचा काहीच उपयोग नसेल तर त्यांची 'विल्हेवाट' लावण्यास आम्ही मोकळे राहिलो पाहिजे.

ते जगभरच्या 'विकसनशील' देशांना तोंडभरून आश्वासन देत आहेत, की आर्थिक विकासाचा हा टप्पा जेव्हा आपण पार पाडू तेव्हा पृथ्वीवर नंदनवन अवतरण्याच्या आपण अधिक जवळ पोचलेले असू. 'व्यवहारी शहाणपणा'पोटी त्यांचे म्हणणे असे आहे की, याची जी वेगवेगळ्या प्रकारची किंमत-जनसमूहांचे चिरडले-भरडले जाणे, विस्थापित होणे, रोजगार नष्ट होणे, संसाधनांची नासाडी होणे, दिवाळखोरी वाट्याला येणे वगैरे प्रकारची-मोजावी लागणार आहे तिची मोजदाद करून मिळवले काय, गमावले काय याचा ताळेबंद मांडणे व्यर्थ आहे. मोजाव्या लागलेल्या किंमतीचा व ज्यांनी किंमत मोजली त्यांचा कालांतराने विसर पडतो; विस्मृतीच्या गर्तेत ते नाहीसे होतात. हा निसर्गाचा निर्घृण न्यायच आहे. जगापाशी आज न्यायबुद्धी जास्त आहे; कमीत कमी लोकांना कमीत कमी किंमत मोजावी लागेल असे पाहण्याचा आपण जरूर प्रयत्न करू, असे त्यांचे सांगणे.

'अधिकात अधिक लोकांचे अधिकाधिक सुख' साधण्याचा, ते साधीत असताना आधुनिकतेच्याच चौकटीत स्वातंत्र्य, समता, न्याय या संकल्पनांचा आदर करणारा, 'युटिलिटेरियनिझम' या नावाने ओळखला जाणारा नीतिविचार हा आधुनिक पश्चिमी सभ्यतेच्या चौकटीत सर्वाधिक उन्नत व आदर्शवादी नीतिविचार म्हणावा लागेल. या नीतिविचाराच्या मर्यादेत आजच्या लिबरल भांडवली अर्थव्यवस्थेच्या जगात जास्तीत जास्त काय साधले जाऊ शकते त्याची काही वास्तव कल्पना आपणास 'स्वास्थ्यपूर्ण चिरस्थायी विकासा'च्या विषयातील अनुभवावरून करता येते.

आपण जो विकल्प सुचवू तो भारतातील परिस्थिती, गरज व आपली ध्येयदृष्टी ध्यानात घेऊन सुचवला पाहिजे हे तर झालेच. पण तो सगळ्या जगालाही लागू पडेल असा असला पाहिजे. तो निरपवादपणे सर्वांसाठी उपकारक व इष्ट

असला पाहिजे. साम्यवाद हा तो विकल्प आहे असे विसाव्या शतकाच्या १९२० ते १९५० पर्यंतच्या काळात जगभर अनेकांना वाटत होते. आज आपणास सोविएत रशिया, चीन, इतर साम्यवादी राष्ट्रे यांच्याबद्दल जे सारे माहीत आहे ते ध्यानात घेतल्यावर या काळातला साम्यवाद (आणि १९५० ते २००० या काळातला साम्यवादही) विकल्प म्हणून विचारात घेता येत नाही हे मोठ्या खेदाने पण शांतपणे स्वीकारावे लागते. माणसाचे माणूसपण व माणसाचे पूर्ण वहरून येणे याविषयी मार्क्सची जी दृष्टी होती, त्याची जी मांडणी होती त्यावर आपल्या विकल्पाची उभारणी केली पाहिजे ह्याचे त्याचवेळी भान बाळगले पाहिजे. मार्क्सच्या विचारात 'श्रमा' (labour) चे स्थान माणसाचे माणूसपण घडण्यात व वहरून येण्यात मध्यवर्ती महत्त्वाचे आहे'. 'From each according to his ability and to each according to his need' हे मार्क्सचे वचन या संदर्भात असेच कळीचे महत्त्व राखते. राज्यसंस्थेच्या विलयाचे लक्ष्यही त्याने पुरस्कारिलेल्या वेगळ्या वाटेचे सूचक आहे. इतिहासाची मार्क्सची वर्गसंघर्षात्मक मांडणी हा मार्क्सच्या विचारातला विशेष घटक मानला जातो. पण वस्तुतः वेगळ्या ठिकाणीच आपले लक्ष केंद्रित व्हायला हवे आहे. मार्क्सच्या डोळ्यासमोरील नवा औद्योगिक कामगारवर्ग हा त्याच्या नजरेत समाजातला असा एकमेव वर्ग होता की ज्या वर्गाचे आधीपासून चालत आलेले हितसंबंध नव्हते, कारण ज्यांच्यापाशी 'गमविण्यासाठी काहीच उरलेले नाही' अशांचा, अगदी तळाशी ढकलल्या गेलेल्यांचा तो वर्ग होता. त्याची मुक्ती म्हणजेच नव्या समाजाची नांदी ठरणार अशी त्याची धारणा होती. म्हणजे, एका अंगाने पाहिल्यास, महात्मा फुले स्त्रिया व 'शूद्रादिअतिशूद्रांचा' पक्ष घेऊन उभे राहिले तशीच ही गोष्ट होती. हा वर्ग स्वतःचे गमावलेले मनुष्यपण पुनरपि संपादित व प्रस्थापित करण्यासाठी उद्युक्त झालेला वर्ग असेल हे त्याचे गृहीतक होते.

मार्क्सचे परिस्थितीचे वाचन व भविष्याविषयीचे अंदाज कोठे चुकले, राज्यक्रांत्या का फसल्या वा घडून आल्याच नाहीत, याचे विश्लेषण करता येईल (तसे ते केलेही गेले आहे.) पण मार्क्सनंतरच्या दीडशे वर्षांच्या इतिहासापासून, आणि भारतातीलही आपल्या परिवर्तनवादी राजकारण-समाजकारणापासून, काही बोध आत्मसात करण्याची गरज आहे. विशिष्ट आर्थिक-राजकीय-सामाजिक हितसंबंधाभोवती जेव्हा एखादा समूह संघटित होतो आणि प्रस्थापित होतो तेव्हा, समाजव्यवस्थेतला कनिष्ठ स्थानी असलेला तो समूहदेखील (जात-जमात वा वर्ग) क्रांतिकारक जाणीवसंपन्न राहात नाही; लाभ व सत्ता यांच्यात आपणास इतरांच्या तुलनेत जास्त मोठा वाटा मिळविण्यासाठी, विषमता टिकवून वरिष्ठ स्थानी पोचण्यासाठी संघर्ष करणारा (व तडजोडी पण करणारा) तो वर्ग बनतो. वर्गीय वा विभागीय/क्षेत्रीय लढ्यांमधून नवसमाजनिर्मितीच्या दिशेने पाऊल पुढे पडत नाही. मार्क्सच्या तरुणपणापर्यंतचा म्हणजे अठराव्या शतकाचा अखेर आणि एकोणिसाव्या शतकाची पहिली काही दशके काळ असा होता की जमावाने केलेल्या सशस्त्र उठावाद्वारे केंद्रीय राज्यसत्ता ताब्यात घेणे अवघड नव्हते. 'राज्यक्रांतिद्वारा नवसमाजनिर्मितीचा आरंभ' हा सैद्धांतिक आकृतिबंध व हे प्रारूप क्रांतिकारक परिवर्तनवाद्यांच्या मनात नंतरच्या शे-दीडशे वर्षे घट्ट रुतून बसलेले आहे. पण अशा राज्यक्रांत्या ज्या देशांमध्ये घडून आल्या तेथेही एक ना एक प्रकारची हुकुमशाही राजवट — पक्षाची वा कंपूची — प्रस्थापित होते आणि मनात कल्पना केलेली असते तो नवसमाज साकार होत नाही हाच निरपवादपणे अनुभव राहिला आहे.

**परिवर्तनाचे प्रारूप, प्रक्रिया व साधनमार्ग**

'जागतिकीकरण' — 'उदारीकरण'चा प्रतिवाद हा नवसमाज-निर्मितीचे ध्येय उराशी बाळगून आपण करीत आहोत असे मी येथे गृहीत धरले आहे. वर्गसंघर्ष आणि राज्यक्रांती यांच्यावर आपण अवलंबून राहू शकत नसलो तर, हे परिवर्तन कोणाच्या भरंवशावर व कोणत्या मार्गाने घडून येऊ शकते?

आधुनिक पश्चिमी सभ्यतेचा मार्क्स-गांधीप्रणीत अव्हेर, आधुनिक युगाच्या वारशातले, नीरक्षीरविवेकाने, जे चांगले, उपकारक व इष्ट आहे ते आत्मसात करून मानवी सभ्यतेच्या एका नव्या विकल्पाचा अंगीकार या दोन खुंट्या आपण पक्क्या ठोकलेल्या आहेतच. यामध्ये दोन-तीन पायाभूत आग्रहांची भर टाकायला हवी, म्हणजे स्वतःला बांधून घेणाऱ्या खुंट्या ठोकायला हव्यात. समाजातील सर्व घटकसमूह, आर्थिक-सामाजिक स्तर, लोक यांचा व्यापक सहभाग राहिला पाहिजे, आणि हा सहभाग त्यांची नैतिक संवेदनशीलता, त्यांचे सर्जक कर्तेपण-क्षमता, त्यांचे ज्ञान व कौशल्य यांची वाढ करणारा असला पाहिजे; नवसमाजाचे निर्माते व धुरीण बनण्याची त्यांची पात्रता सतत

वाढत गेली पाहिजे. साध्यसाधनविवेक व साधनशुचिता यांचे महत्त्व ओळखून त्यांचा आग्रह राखला पाहिजे. नवसमाज-निर्मितीमध्ये राज्यसत्तेची भूमिका मध्यवर्ती व वरचढ नसावी; ती गौण व पूरक राहिली पाहिजे. हे घडून येण्यासाठी लोकांच्या सर्जक अभिक्रमाने गावसमुदाय ते राष्ट्रसमुदाय, व त्याही पलीकडे नागरिक समाज, येथपर्यंत विविधस्तरीय अशी रचनात्मक कार्ये समर्थपणे संघटित होणे महत्त्वाचे आहे.

जागतिक पातळीवर पर्यायी व्यवस्थेचे एक चित्र, एक दर्शन (vision) डोळ्यासमोर हवे. इतिहासाच्या वाटचालीत एका टप्प्यावर धर्म-तत्त्वज्ञान या क्षेत्रांमध्ये विचार व कल्पना यांना वैश्विक परिमाण प्राप्त झाले. जगभरच्या अखिल मानवजातीची 'वसुधैव कुटुंबकम्' या स्वरूपात कल्पना केली गेली. इहलौकिक व्यवहारांच्या पातळीवरही पृथ्वीवरचे सर्व जनसमूह व प्रदेश एकमेकांशी जोडले जात जात 'एक जग' व्यवहारातही अस्तित्वात आले. 'जगाचे एकत्व', 'अखिल मानवजात' या संकल्पना आपण विसर्जित करू इच्छित नाही. तर, आजच्यापेक्षा अधिक सार्थपणे, सत्-असत्विवेकाशी संवादी व जैविक स्वरूपात त्या मूर्त करावयास आपण मागत आहोत, ही गोष्ट, ही खुंटी ठोकून पक्की करण्याची आहे.

या संदर्भात अगदी अलिकडच्या काळात पुढे आलेला कळीचा मुद्दा जगभर विखुरलेल्या 'आदिवासी' जनसमूहांच्या अस्मिता व संस्कृती, त्यांचे राजकीय-आर्थिक स्थान व आविष्कार, हा आहे. विभिन्न राष्ट्र-राज्यांच्या 'मुख्य प्रवाहा'त त्यांच्या अस्मिता, संस्कृती, जीवनशैली विलय पावणे अनिवार्य, गरजेचे, इष्ट, त्यांच्याही दृष्टीने उपकारक आहे अशी कालपरवापर्यंत मान्यता होती. कारण 'प्रगल्भ व प्रबुद्ध' जगाच्या नजरेत ते रानटी, अडाणी व मागास गणले गेले होते. बहुतेक देशांमध्ये ते पददलित व शोषित, उपेक्षित होते. त्या जनसमूहांची स्वतःकडे पाहावयाची दृष्टी बदलली आहे, आणि मुख्य प्रवाहातील अनेकांची दृष्टीही सुजाण व प्रबुद्ध बनली आहे. त्यांच्या वांशिक-सांस्कृतिक वैशिष्ट्यांसह, अस्मितांसह त्यांना आत्मसन्मानाने बरोबरीच्या नात्याने सहभागी होता येईल, आणि स्वयंनिर्णयाने त्यांच्या त्यांच्या पद्धतीने आधुनिक जगाशी एकरूप होता येईल अशी जगाची पुनर्रचना कशी करता येईल, हा आज सर्जनशील चिंतनाचा विषय आहे.

एक सचेतन पर्यावरणीय व्यवस्था म्हणून पृथ्वीला जाणून घेण्याच्या दिशेने अलिकडच्या तीस-चाळीस वर्षांमध्ये जी प्रगती आपण साधली आहे, जी जाणीवजागृती व सदसद्विवेक जागरण घडून आले आहे त्यांचे एक मोठे योगदान नवसमाजनिर्मितीच्या चळवळीस यापुढच्या काळात घडणार आहे. सूक्ष्म स्थानिक पर्यावरणीय व्यवस्था पृथ्वीवर अगणित आढळतात, पण त्या सुट्या सुट्या, परस्परांशी असंबद्ध असल्याचे आढळत नाही; स्थानिक ते वैश्विक अशी एक साखळी, एक गुंफण, एक जाळे आढळते. पृथ्वीचे वातावरण (global climate) ही जगड्व्याळ व्यवस्था आहे पण ती सूक्ष्म स्थानिक हवामानव्यवस्थांची परस्परांमध्ये गुंफण होत, क्षेत्रीय, प्रादेशिक, उपखंडीय अशा उच्च-उच्चतर विशाल व्यवस्थांच्या एका संरचनेचा टप्पा पार करीत जगड्व्याळ व्यवस्थेत परिणत होते. थोडक्यात, कल्पनातीत वैविध्य आणि त्या सर्व वैविध्यांना कवेत घेणारे, वैविध्याचे संवर्धन करीत साधले गेलेले एकत्व हे निसर्गसृष्टीचे अद्भूत वैशिष्ट्य अनुभवाला येते. राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय पातळ्यांवर मानवसमूहांचे वैविध्याच्या पायावर एकत्व साकारणारी जागतिक व्यवस्था आपण निसर्गसृष्टीपासून बोध घेऊन उभी करावयास हवी. उत्क्रांतीचा हा पुढचा टप्पा म्हणता येईल.

खरे तर याबाबतीत जगभरच्या जनसमूहांनी उच्च कोटीची प्रतिभा पूर्वापार प्रकट केली आहे. वस्तुस्थिती अशी आहे की, पृथ्वीवर प्राणिजाती म्हणून माणसांचे (*Homo sapiens*) पुंजके जागोजाग जन्म पावले. भोवतालच्या भौगोलिक वनस्पती-प्राणीसृष्टीच्या पर्यावरणाची ओळख करून घेत जगण्याचा प्रश्न त्यांना सोडवावा लागला. यासाठी उपयोगी अशा क्षमता निसर्गानेच मानवाच्या ठायी घातलेल्या होत्या. जिज्ञासा, शोधबुद्धी, प्रयोगक्षमता, कल्पकता व तर्कशक्ती यांची देणगी माणसाला तर अगदी आरंभालाच मिळालेली दिसते. जगण्याचे आव्हान कोणते मानवी पुंजके यशस्वीपणे झेलू शकले? तर्क असा होतो की, ऋणानुबंधात्मक नाती आपापसात प्रस्थापित करू शकलेल्या पुंजक्यांचे रूपांतर 'गोतावळ्या'त झाले आणि त्याने त्या गोतावळ्यांची तगून राहण्याची क्षमता अनेकपटींनी वाढली. माणूस एकाच वेळी, व्यक्तित्वसंपन्न व आगळावेगळाही असतो आणि गोतावळ्याचा/गणगोताचा घटक भाग असलेला समाजशील पण असतो; स्त्री व पुरुष वेगवेगळे 'पूर्ण' असतात आणि दोहोंच्या अनिवार्यपणे घडणाऱ्या मीलनातूनही एक 'पूर्ण'च आकाराला येते. साक्षात प्रत्ययाच्या या गोष्टींमधून माणसाची जाण समृद्ध व विकसित झाली. 'स्व' आणि 'पर' हे भान, आणि त्याबरोबर द्वंद्वात्मक व संयोगस्वरूपी संबंधाचे भानही.

आदिमतम काळीही माणसांचे गोतावळे दूरदूरपर्यंत वेगवेगळ्या कारणांनी भ्रमंती करीत होते असे दिसते. या भ्रमंतीच्या ओघात अन्य गोतावळ्यांशी त्यांची गाठभेट पडणे अटळ होते. आपणाहून वेगळी तरीही ही आपल्याच जातीची आहेत, हे भान त्या गोतावळ्यांतल्या व्यक्तींना आले असणार. कुतूहल-आकर्षण व भय-अपकर्षण, दोन्ही भावना जागृत होत असतील; अपरिचित असे काही समोर आले की, आजही आपली प्रतिक्रिया अशी दुहेरीच होते. यामधून काही गोतावळ्यांची सरमिसळ सुरू झाली असेल तर काहींशी दुराव्याचे-शत्रुत्वाचे नाते. जगभर आजही कमालीचे वैविध्यपूर्ण व उद्‌बोधक असे वास्तव आढळते. आजही पृथ्वीच्या पाठीवर आदिम म्हणावे अशा अवस्थेत जीवन जगणारे, अगदी लहान, शेकड्यांमध्ये लोकसंख्या असलेले समुदाय आहेत. ('रानटी टोळी समाज' — Primitive tribal communities — असे त्यांचे वर्णन करून आजही त्यांना कमी लेखण्याची घोर चूक आपण करतो.) पुढे, अनेकानेक 'गोतावळ्यां'चे रूपांतर लहानमोठ्या संमिश्र समाजांमध्ये (जाती-जमातींमध्ये) झाले. विविध आकारमानांच्या, कमीअधिक व्यामिश्र असलेल्या वांशिक-सांस्कृतिक समुदायांची मिळून 'मानवजात' बनलेली आहे व अस्तित्वात आहे. शुद्ध वांशिक समुदाय जगात कोठे असलेच तर अपवादभूतच असतील. येथे महत्त्वाचा मुद्दा हा आहे की, एका अतिप्रदीर्घ कालावधीवर पसरलेल्या या प्रक्रियेमधून स्वतःची वैशिष्ट्यपूर्ण पृथगात्म भाषा, जीवनशैली, जीवनदृष्टी, संस्कृती असलेले अस्मितासंपन्न लोकसमूह आकारास आले. निरपवादपणे, यांपैकी प्रत्येक लोकसमूह, मग तो कितीही लहान लोकसंख्येचा का असेना, नामवंत आहे. अशा प्रत्येक लोकसमूहाचा एकेका निवासक्षेत्राशी (habitat) — भूमी वा नदी वा जलाशय/सागर वा पर्वतराजी — इतिहासपरंपरेने आत्मीय संबंध आढळतो; ते भौगोलिक क्षेत्र त्यांची पुण्य पितृभू/मातृभू असते, त्यांचे अस्तित्व अर्थपूर्णरित्या त्या निवासक्षेत्राशी अभंगपणे जोडलेले असते. कोठल्याही एका जागेवर वर्षभर स्थिर वस्ती करून न राहणाऱ्या गुराखी व अन्य जमाती जरी आपण उदाहरणादाखल घेतल्या तरी त्यांचा असा खोलवरचा, पिढ्यान-पिढ्यांचा अनुबंध 'भूमी'शी असल्याचे आढळते.

एका भारताची गोष्ट घेतली तरी काय चित्र दिसते पहा. जेव्हा चातुर्वर्ण्याच्या संकल्पनात्मक व्यूहामधील जातिव्यवस्था आकाराला आलेली नव्हती असा एक काळ होता. त्या काळी भारतभर लहानमोठे जनसमूह आपापल्या 'भूमी'त — निवास-क्षेत्रांमध्ये — राहात होते. कोणताही जनसमूह काही काळपावेतो आपली स्वतःची इतरांपासूनची वेगळी ओळख अधोरेखित करीत जगतो तेव्हा त्याचे आधार काय असतात? मुख्य आधार १) भाषा; २) उपजीविका संपादन करण्याची साधने, तंत्रे, प्रकार, रीतीभाती; ३) सामूहिक जीवनाचे संस्थात्मक संघटन, आणि ४) व्यापक अर्थाने ज्यांना धार्मिक, तात्त्विक व कला व्यवहार म्हणता येतील अशा गोष्टी, अशी काहीशी मांडणी आपणास करायला लागेल. भाषेच्या अभावी, भाषेद्वारा साधल्या जाणाऱ्या संवाद व देवाणघेवाणीखेरीज माणसाला माणूसपणही प्राप्त होऊ शकत नाही, आणि भाषा आणि समूहजीवनही आकाराला येऊ शकत नाही. पायाभूत, आधारभूत अशा प्रत्येक गोष्टीसंबंधी आपणास हेच म्हणता येईल. आपापल्या वैशिष्ट्यपूर्ण भाषा, जीवनशैली, विचार, संकल्पना, इत्यादींची इतकी वैविध्यपूर्ण निर्मिती, तीही इतक्या प्राचीन काळी, ही अद्‌भुत सर्जनशील मानवी कृती आहे. पृथ्वीवर स्वायत्त, पृथगात्म आणि तरीही परस्परांत गुंतलेल्या, परस्परांवर परिणाम करणाऱ्या, परस्परांशी देवाणघेवाण करणाऱ्या अशा अगणित स्थानिक (local) भौगोलिक पर्यावरणीय व्यवस्था उत्क्रांत झालेल्या आहेत; आणि, त्याचवेळी, या सर्व स्वायत्त, स्थानिक, क्षेत्रीय, प्रादेशिक पर्यावरणीय व्यवस्थांना सामावून घेणारी पृथ्वीव्यापी आणि आणखी वरच्या टप्प्यावर विश्वव्यापी पर्यावरणीय व्यवस्थाही आहे. असे दिसते की एकेका वैशिष्ट्यपूर्ण पर्यावरणीय व्यवस्थेत जगण्याच्या ओघात मानवी समूहांनी जगण्यासाठीची, अनिवार्य गरज म्हणून भाषा, जीवनरीती, समाजसंघटन, संस्कृती यांची निर्मिती केली. ती करीत असताना स्वतःच्या ठायी असलेल्या सर्जक नवनवोन्मेषशाली प्रतिभेचाही अविष्कार माणसाने व्यक्तिशः व सामूहिक पातळीवर केला.

मानवजातीच्या वाटचालीचा इतिहास हा मुग्ध करून टाकणारा मनोरंजक इतिहास आहे. स्वतःच्या जनसमूहांबाहेरील इतर, परक्या जनसमूहांशी गाठभेट, आघातप्रत्याघात, देवाणघेवाण ही सारी घडामोड पृथ्वीवर सर्वत्र एकाच प्रकारे घडली नसणार पण यामधूनच सरमिसळीची, संयोग घडून येण्याची प्रक्रिया गतिमान होऊन कालांतराने जगात कोठे कोठे मोठे, व्यामिश्र समाज अस्तित्वात आले. एका अंगाने पाहिल्यास, 'जागतिकीकरण' — 'उदारीकरणा'च्या प्रक्रियेचा आरंभ आपणास तिथपर्यंत इतिहासात मागे नेता येतो, न्यायला हवा, ही गोष्ट लक्षात घ्यायला हवी. कारण या टप्प्यावर जित-जेते या भेदाचे, एका

लोकांचे दुसऱ्या लोकांवरच्या प्रभुत्वाचे भान आहे; अभिजन-बहुजन ही विभागणी वंश व संस्कृतिश्रेष्ठत्वाविषयीच्या सजग (self conscious) भूमिकेवर आधारलेली आहे. या टप्प्यावर शोषण, अन्याय, विषमता, दडपणूक यांचा घाट बदलतो, त्यांचे आधार बदलतात; आंतरप्रादेशिक, आंतर-लोकसामूहिक व्यापार, देवाणघेवाण यांची भरभराट व त्यांमधून उत्पन्न होणारे उत्पादनांचे, कौशल्यांचे व व्यवसायांचे विशेषीकरण — आधुनिक अर्थशास्त्रीय परिभाषेतील श्रमविभागणी — आढळते. सर्व जगभर ही घडामोड एकाच वेळी, एकाच पद्धतीने आणि एकसारखी व एकछाप घडून आली नाही. पण जेथे जेथे ही घडामोड झाली तेथे तेथे प्रचंड घुसळण झाली. घुसळणीच्या ओघात फार मोडतोड व विध्वंसही झाला.

याच टप्प्यावर माणसाच्या सर्जनशीलतेने एक नवा उच्चांक गाठला. मोठी लोकसंख्या, अनेक लोकसमूहांचे संमिश्रण-सहअस्तित्व, जित-जेते संबंध, श्रमविभागणी, विशेषीकरण यांवर आधारलेली अनेक वस्तू व सेवांचे उत्पादन करणारी, त्यांची व्यापाराद्वारे दूरपर्यंत देवाणघेवाण करणारी अर्थव्यवस्था, केंद्रीभूत शासनसंस्था व धर्मसंस्था यांचा आढळ होणाऱ्या प्राचीन सभ्यतांच्या उदय-उत्कर्षाचा हा आद्य कालखंड आहे. वैचारिक-सांस्कृतिक घुसळणीच्या एका टप्प्यावर असे धर्म, अशी दर्शने उत्पन्न झाली जी एकेका विशिष्ट समाजाची, त्या त्या समाजापुरती नव्हती. अखिल मानवजातीचा विचार त्यांमध्ये आढळतो. उदाहरणार्थ, बौद्ध, जैन धर्मविचार, वेदांताचे तत्त्वज्ञान, किंवा काही काळाने उत्पन्न झालेली येशू ख्रिस्ताची शिकवण व सापेक्षतः अलीकडच्या काळातील महंमद पैगंबरांची शिकवण घ्या. ते वैश्विक मानवधर्म आहेत वा कोणीही आपली म्हणू शकेल अशी ती दर्शने आहेत.

आज आपण ज्या टप्प्यापर्यंत आलो आहोत तेथून पुढे जायचे असेल तर जीवनाच्या प्रत्येक अंगाचे एक जागतिक परिमाण आहे आणि म्हणून त्याची व्यवस्था काही बाबतीत जागतिक असणार, असणे युक्त व गरजेचे आहे हे जाणले व स्वीकारले पाहिजे. त्याच वेळी, जगाला एकछाप बनवू पाहणाऱ्या काही महासत्तांच्या ताब्यात जगाला देऊन टाकणेही आपल्याला नाकारावयाचे आहे. ही गोष्टी अशी साधावयाची आहे की ज्यामुळे मार्क्सच्या अर्थाने माणसाला माणूसपणापासून पारखे (alienation) व्हावे लागू नये, त्याचे सर्जक कर्तेपण बहरून यावे, बंधुभाव व समता, न्याय यांचीच त्या कर्तेपणामधून प्रस्थापना व्हायला हवी, आणि सर्वांना खाऊनपिऊन सुखी जीवन जगत आपल्या आपल्या कल्पनेनुसार स्वतःचे मनुष्यजीवन सार्थक करता यावे.

हे ध्येय साकार करण्यासाठी सहाय्यभूत व उपकारक राजकीय व आर्थिक-औद्योगिक व्यवस्था कशी उभी करावयाची व तिचा घाट काय असेल याचा मार्ग आपल्याला गांधींनी दाखविला. दक्षिण आफ्रिकेत स्वतःची जीवनदृष्टी, जीवनशैली व जीवनमार्ग यांना आकार देण्यात त्यांच्या आयुष्याची ऐन उमेदीची वर्षे त्यांनी घालविली. आपणास माहीत आहे की, दक्षिण आफ्रिकेतील श्रीमंत हिंदी व्यापाऱ्यांनाही तेथे काळी माणसे म्हणून मानहानी-कारक वागणूक दिली जायची. 'पैसा तर मिळवता येतोय ना' असे म्हणून ही मंडळी त्या वर्णभेदजन्य वागणुकीचा स्वीकार करीत होती. करारपत्रांवर सह्या करून मजूर म्हणून तिथे गेलेल्या गोरगरीब, अशिक्षित, खेडूत हिंदी लोकांची स्थिती तर आणखीच वाईट होती. गांधींनी उभारलेला पहिला लढा हा स्वतःचा आत्मसन्मान संपादन करण्यासाठीचा लढा होता. आता, आत्मसन्मान ही गोष्टच अशी आहे जिची संपादणी स्वतःमध्ये आत्मसन्मान जागृत करून, आपल्या दृढ वर्तणुकीने प्रतिपक्षीयांचा आदर संपादन करून करावयाची असते. या लढ्यात प्रतिपक्षावर कोणत्याच प्रकारे हल्ला केला गेला नाही, मालमत्तेची मोडतोड, जाळपोळ, लुटालूट या प्रकारे त्यांचे नुकसान केले गेले नाही; हत्या केली गेली नाही. गौरवर्णियांच्या-वतीने हे सर्व प्रकार केले गेले पण हिंदी लोकांनी स्वतःचा मान राखला आणि प्रतिपक्षाशी सभ्य, सुसंस्कृत वर्तन केले.

या लढ्याच्या काळात व ओघात, गांधींनी त्यांची जीवनदृष्टी पूर्ण बदलली. त्यांचे इंग्लंडमधील शिक्षण व त्यांचा व्यवसाय यांना साजेशी अशी जीवनशैली त्यांनी आपल्या पत्नीवर व मुलांवर लादावी, एवढी त्या काळी त्यांची आधुनिक पश्चिमी सभ्यतेवर निष्ठा होती. ही तथाकथित प्रगत, उच्च संस्कृती कोणत्या प्रकारच्या अमानुषतेवर आधारलेली आहे त्याचे नागडे व निर्लज्ज प्रदर्शन त्यांनी दक्षिण आफ्रिकेत पाहिले. मग त्यांनी स्वतःपासून (आणि कुटुंबियांपासून) जीवनशैलीत आमूलाग्र बदलास आरंभ केला (कस्तुरबा व मुले यांच्यावर ही दुसऱ्यांदा, उलट दिशेची, लादणूकच होती). येथे आपल्याला महात्मा जोतीबा फुले यांची आठवण व्हावी. मार्क्सवादी परिवर्तनवादी चळवळीत एकेकाळी तरी बराच प्रचलित असलेला इंग्रजी

शब्द वापरावयाचा तर, फुल्यांप्रमाणेच गांधींनी स्वतःला declass केले. श्रमनिष्ठ, उत्पादकांचे (शेतकरी, कारागीर या प्रकारचे) कमालीचे स्वावलंबी जीवन त्यांनी अंगिकारले. भारतातील त्यांच्या कुटुंबियांपासूनही ते दुरावले.

गांधी व्यवहारकुशल, व्यवहारदक्ष व इहलौकिक व्यवहाराची जाण असलेले गृहस्थ होते. आणि ते स्वतःला व जगाला बदलायला निघाले होते. पश्चिमी सभ्यतेला अव्हेरतानाही त्यांनी त्या सभ्यतेमधल्या अनेक चांगल्या, उपयोगी व उपकारक गोष्टी अंगिकारल्या. त्यांनी स्थापन केलेले आश्रम या नवसमाज-निर्मितीच्या प्रयोगशाळा होत्या. यामध्ये त्यांनी लढ्यात सहभागी झालेल्या सामान्य स्त्रीपुरुषांनाही सहभागी करून घेतले ही विशेष गोष्ट ध्यानात घ्या.

भारतात परतल्यावर एका उपखंडव्यापी बृहत् समाजाचे उत्थान घडवून आणावयाचे आव्हानच त्यांनी झेलल्याचे आढळेल. ज्याचा तळ गाठता येत नाही असे येथील दारिद्र्य त्यांनी पाहिले. लोकांच्या हातांना काम नाही, रोजगाराच्या अभावी मिळकत नाही, आणि त्यामुळे येणारी उपासमार व हलाखी हे सारे त्यांनी पाहिले. एका बाजूला, राजकीय स्वातंत्र्य प्राप्त करण्यासाठी त्यांनी येथील ब्रिटश सरकारच्या तोडीस तोड अशी राष्ट्रव्यापी व केंद्रीय राजकीय संघटना बांधली. भारतातल्या शहरांमधील उच्चशिक्षित उच्चभ्रू पांढरपेशांचा सरकारदरबारी अर्ज विनंत्या करणारा तीन दिवसीय मेळा, हे काँग्रेसचे रूप त्यांनी पार पालटून टाकले. देशाच्या कानाकोपऱ्यात पोचलेली शिस्तबद्ध संघटना अशी तिची बांधणी केली. काँग्रेसची वर्किंग कमिटी म्हणजे १९२० ते १९४७ या काळात, लोकसंमतीवर अधिष्ठित, देशाचे 'मंत्रिमंडळ'च होते. गांधींची पुष्कळ शक्ती, बुद्धी व वेळ काँग्रेसच्या राजकीय कार्यात खर्ची पडला. पण गांधींना जास्त रस भारतात एका नव्या समाजाची पायाभरणी करण्यात होता. अशा तत्त्वांवर व आराखड्यानुसार ती बांधणी ते करीत होते की जी तत्त्वे व जो आराखडा, देशकालपरिस्थिती-नुसार त्यात योग्य ते फेरबदल करून, जगभर लागू करणे जगाच्या दृष्टीने उपकारक, इष्ट व आवश्यक होते.

त्यांच्या काळच्या भारतात शेकडा ऐंशी टक्के लोक ग्रामीण भागात खेड्यांमध्ये राहत होते व शेतीवर अवलंबून होते. ही खेडीच मोडकळीला आलेली होती, त्यांना अवकळा प्राप्त झाली होती. संकुचित मनांची, जातपातीने दुबळी झालेली, अस्पृश्यतेचा कलंक मिरवणारी, भयग्रस्त व दडपलेली शोषितपीडित जनता जेथे राहते अशी ही खेडी, 'घाणीची आगरे' हे वर्णन काही एका अंगाने सार्थ करणारी होती. खेड्यांचे सर्वांगांनी पुनर्निर्माण करूनच भारतीय समाजाचे स्वातंत्र्य व उत्थान साधता येणार आहे, या निष्कर्षावर गांधी आले. सर्वथैव योग्य असाच तो निष्कर्ष होता. त्यांनी शहरांचा वेगळा विचार केला नाही. पण ती जोड आपण देऊ शकतो. त्यांनी राष्ट्रीय पातळीवरील अनेक मुद्यांचा विचार केला नाही; शेती व उद्योगधंदे यांचाही विचार काहीसा बाजूला ठेवला. राजकीय स्वातंत्र्य मिळाल्यावर याची जोड स्वतंत्र भारताचे शासन देईल हा विश्वास त्यांनी बाळगला होता. (पं. नेहरू व त्यांचे बहुतेक सहकारी, भारतातील उच्चशिक्षित पांढरपेशा शहरी वर्ग, येथील नोकरशाही, उद्योगपती-व्यापारी-जमीनदार वर्ग यांनी, भारताच्या आर्थिक-राजकीय विकासासाठी राज्यसत्तेच्या प्रभुत्वाखाली नियोजनबद्ध आर्थिक विकासाच्या संकल्पनेची जोड देऊन पश्चिमी नमुना स्वीकारून गांधींचा मार्ग बाद ठरविला, ही गोष्ट वेगळी.)

शेती आणि गृहोद्योग-ग्रामोद्योग यांच्या योग्य त्या मिश्रणाने समुदायातील सर्व सक्षम स्त्रीपुरुषांना वर्षभर नियमित स्वरूपाचा उत्पादक रोजगार पुरविण्याची क्षमता बाळगणारा, अन्यधान्य, वस्त्र व निवारा याबाबतीत किमान प्राथमिक स्वावलंबन साध्य करू शकेल अशा आकारमानाचा गाव-समुदाय हे पायाभूत एकक गांधींच्या डोळ्यासमोर होते. अस्पृश्यता, उच्चनीचभाव व वर्तणूक यांची पुष्टी करणारी जातपात, हिंदू-मुसलमान-ख्रिश्चन-शीख हा भेदभाव व त्या आकारे केला जाणारा दुस्वास व अन्याय, स्त्रियांना दिली जाणारी हीन वागणूक या काही गोष्टींचे लौकरातलौकर उच्चाटन झाले पाहिजे, त्याशिवाय गावसमुदाय त्यांच्या अर्थाने एकक बनू शकत नाही असे गांधी म्हणाले असते.

आजचा विचार व्यक्तीच्या मूलभूत हक्कांची व नागरिक स्वातंत्र्याची गोष्ट महत्त्वाची मानतो. गांधींची भूमिका अशी राहिली की स्वतःच्या व इतरांच्या संबंधातले कर्तव्यपालन केल्यानंतरच हक्कांची गोष्ट करणे व्यक्तीला शोभून दिसते. कर्तव्यपालनामधूनच माणसांमध्ये पारस्परिकता व ऋणानुबंध निर्माण होतात, बंधुभाव उत्पन्न होतो. परस्परांच्या स्वातंत्र्याची व समतेची, न्याय्य वागणुकीची हमी खऱ्या अर्थाने यामधून मिळत असते. याचीच थोडी वेगळ्या प्रकारे मांडणी करून गांधींनी शेजारधर्म व स्वदेशी ही नवसमाजनिर्मितीची दोन तत्त्वे निष्पादित केली. अन्न-वस्त्र-निवारा यांबाबतीत गावसमुदाय

स्वावलंबी असावा, हे गांधींचे म्हणणे योग्य प्रकारे समजून घेतले गेलेले नाही. प्रत्येक खेडे सर्व गरजांच्या पूर्ततेच्या संदर्भात, स्वयंपूर्ण असावे तसे त्यांचे म्हणणे नव्हते. स्वयंपूर्णता अशक्य असल्याचे ते जाणत होते. एकमेकांमध्ये संवाद, दळणवळण, परस्परावलंबन, देवाणघेवाण नसलेले सुटे सुटे, परस्परांपासून तुटलेले असे गावसमुदाय असतील/असावेत असा अर्थ गांधींना अजिबात अभिप्रेत नव्हता. त्यांच्या कल्पनेतील गावसमुदाय मनाने, विचाराने व संस्कृतीने अखिल मानवजातीशी म्हणजे जगभरच्या गावसमुदायांशी अर्थपूर्णरित्या व जिवंतपणे जोडलेले असणार होते. आज गावसमुदाय हे अंकित, शोषित-पीडित व हीन वागणुकीने अवमानित अवस्थेत आहेत. आधुनिक पश्चिमी सभ्यतेने भारतातील खेड्यांची स्वायत्तता, सामर्थ्य आणि ज्ञान-कौशल्य-क्षमतांचे संचित बरबाद केल्याचे गांधी जाणत होते. किमान बाबींमध्ये स्वावलंबन साध्य केलेल्या, स्वतःच्या पायांवर उभ्या राहिलेल्या गावसमुदायांनी विश्वाची चिंता करायचीच आहे; पण व्यवहारात त्यांनी शेजाऱ्यांशी जोडून घेण्याला, त्यांच्या-बरोबरच्या सहकार्य व देवाणघेवाणीमधून, त्यांच्याबरोबरच्या संयुक्त कृतींद्वारा परस्परांची स्वायत्तता मजबूत करावयाला, स्वावलंबनाची मात्रा वाढवावयाला प्राधान्य द्यावयाचे आहे. उच्चतर पातळीवर बाह्य आर्थिक-राजकीय सत्तांच्या विरोधात स्वतःच्या स्वायत्ततेचे व सामर्थ्याचे रक्षण व संवर्धन करता येण्याचे महत्त्व गांधींनी जाणले होते. गांधींचा स्वदेशीविचार राष्ट्र-राज्याच्या सरहद्दींना फाजील महत्त्व देणारा, इतर राष्ट्रांतील लोकांना परके, प्रतिस्पर्धी वा शत्रू लेखणारा राष्ट्रवादी विचार नाही हे ध्यानात ठेवले पाहिजे.

गांधींच्या विचारव्यूहातील अर्थव्यवस्थेत ग्रामोद्योगांपलीकडे त्याहून मोठ्या क्षेत्रावर कार्य करणाऱ्या उद्योगांना, व्यापाराला व यासाठी आवश्यक त्या व्यवस्था/यंत्रणा यांना स्थान आहे हे, गांधींचे लेखन वाचले तर, लक्षात येते. तीच गोष्ट राज्यसंस्थेची आहे. प्रयोग करीत करीत गांधींना अभिप्रेत असलेल्या स्वायत्त स्वाश्रयी विकेंद्रित अर्थ व राज्यव्यवस्था व्यवहारात प्रस्थापित कराव्या लागतील, कारण मानवी इतिहासात प्रथमच आपण ते आव्हान स्वीकारणार आहोत.

केंद्रित आर्थिक-राजकीय सत्तेवर अंकुश ठेवू शकेल, तिच्याशी असहकार करू शकेल अशा सत्याग्रही लोकशक्तीच्या संघटनेला गांधीविचारात म्हणूनच कळीचे महत्त्व आहे. असेच महत्त्व विश्वस्तवृत्ती या तत्त्वाला आहे. विश्वस्तवृत्ती समाजात जेवढी रुजेल, क्रियान्वित होईल तितके from each according to his ability and to each according to his needs हे मार्क्सचे वचन व्यवहारात उतरेल.

'जागतिकीकरण' – 'उदारीकरण'ला जागतिक पातळीवर दोन अंगांनी पर्याय द्यावा लागणार आहे. चिरस्थायी विकासाची पर्यायी कल्पना व नीती अंगिकारून आणि राजकीय-आर्थिक-सामाजिक क्षेत्रात मूलतः वेगळ्या जीनदृष्टीच्या आधारे पर्यायी समाजव्यवस्थेची कल्पना करून. मार्क्सच्या मानवविषयक तात्त्विक मांडणीमधून, आणि भांडवली अर्थव्यवस्थेच्या ऐतिहासिक-समाजशास्त्रीय विश्लेषणामधून काही मूलभूत गोष्टी आपल्या हाताशी लागतात. गांधींच्या विचारात व जीवनकार्यात त्या दिशेने वाटचाल करावयाचा मार्ग कोणचा, साधने व पथ्ये कोणती यांचा बोध होतो.

**समारोप**

येथवरच्या विवेचनाचा समारोप करण्याआधी काही विशेष मुद्यांचा काही ऊहापोह करणे गरजेचे आहे. हे मुद्दे पुढीलप्रमाणे मांडता येतील १) आपण स्वीकारलेल्या लोकशाही राज्यव्यवस्थेचे ढासळत चाललेले आरोग्य, व त्याचे विघातक परिणाम, २) पर्यावरणाचा ऱ्हास व यामधून उद्‌भवणारे महासंकट, ३) भारतीय समाजातील वाढता फुटीरपणा आणि एकात्म समाज म्हणून धारणा करण्याचे आव्हान, आणि ४) आत्मविश्वास व पुरुषार्थ जागरण यांचा मार्ग.

१९५० साली आपण भारतीय संविधान स्वतःसाठी तयार केले. ज्या लोकशाही राज्यपद्धतीचा आपण स्वीकार केला तिचे पायाभूत आधारस्तंभ कोणते म्हणता येतील? १) नागरिकत्व, २) कायद्याचे राज्य, ३) चोख व लोकहितैषी प्रशासन आणि नोकरशाही, ४) नागरिक स्वातंत्र्ये, आणि ५) प्रातिनिधिक राज्यपद्धती. अर्थात, आणखीही काही आधारांचा उल्लेख करता येईल.

भारतीय लोकशाहीचे वाढते अनारोग्य कोणत्या कारणांनी आहे? तर, १) नागरिकत्वाची संकल्पना आणि त्यानुसार व्यवहार येथे रुजला नाही. आपण अजूनही 'प्रजानन' म्हणूनच वागतो. जो सत्ताधारी असतो त्याच्यापुढे नमून असतो. २) प्रौढ मताधिकार हा, सर्व नागरिक समान असतात या गृहीतकृत्यावर आधारलेला आहे. पण जातपात व स्पृश्यास्पृश्यता या आपल्या हाडीमांसी मुरलेल्या असल्याने आपले एकमेकांशी वागणे समानत्वाच्या भूमिकेमधून होत नाही. ३) राज्याने केलेले

कायदे हे नागरिक या नात्याने आपणच केलेले असतात, व त्यांचे पालन करण्यामधून नागरिकत्वाची भूमिका पार पाडण्याचे आपले कर्तव्य असते, ही जाण उत्पन्न झालेली नाही. सरंजामशाही समाजामध्ये 'बळी तो कान पिळी' हा न्याय असतो. जो बलिष्ठ असतो त्याची 'हम करेसो कायदा' अशी भूमिका असते. आजचा रूढ सामान्य व्यवहार पाहिला तर गरीब स्वभावप्रकृतीची माणसे कायद्यांचे, नियमांचे पालन करतात ती जास्त करून 'उगीच भानगड' नको या भीतीने. परिस्थिती सुधारली, बळ प्राप्त झाले, की यांच्यापैकी बरीच माणसे शिरजोर बनून कायदा मोडतात, कायद्याला बगल देण्यात भूषण मानू लागतात; आपण सत्तावान बनल्याची त्यांच्या दृष्टीने ती खूण असते. आपला सार्वत्रिक अनुभव असा की, सरकारी-निमसरकारी नोकरी, मोठ्या कंपनीतली नोकरी, बड्या धेंडाकडील चाकरी ही त्या त्या व्यक्तींना सत्तावान बनविते. नोकरशाही ही, कुंपणानेच शेत खायला लागावे तशी, कायदा न पाळण्याला प्रोत्साहन देते; भ्रष्टाचार यातून फोफावत जातो. ज्याच्या हाती सत्ता असते तोही वृत्तीने, निष्ठेने नागरिक नसतो. इतरांवर सत्ता गाजविणे, सत्ता मिळविणे व तिच्यात भर टाकीत जाणे, आणि सत्तेच्या जोरावर धन प्राप्त करून श्रीमंती थाटात व रुबाबात राहणे हे जवळपास एकमेव जीवनध्येय बनते. कल्याणकारी राज्य (welfare state), नियोजनबद्ध विकास करण्यासाठी हजारो/लक्षावधी कोटी रूपये खर्च करणारे राज्य सर्वदूर पोचणारी नोकरशाही अस्तित्वात आणते. वशिलेबाजी, लाचलुचपत, भ्रष्टाचार सर्वत्र फोफावलेला आपणास आढळत असला तर मग नवल ते काय? पारंपरिक मनोवृत्ती व धारणांमुळे, नात्यागोत्यातील, जातीजमातीमधील माणसांची कामे कायद्याला, नियमांना धरून नसली तरी, 'आपल्या माणसां'ची म्हणून केली जातात. गैर असले तरी 'आपल्या' माणसाला झुकते माप दिले जाते, हा अनुभव पण आपणा सर्वांचा आहे. लोकांचीही यावरून तक्रार असत नाही असे अनुभवाला येते. कायदा-नियम पाळणारे, निष्पक्ष, चोख व कार्यक्षम प्रशासन असले पाहिजे हा आग्रह नसतो; यासाठी रेटा उत्पन्न होत नाही. कारण नागरिक या नात्याने आपण राज्यसंस्थेशी खरोखर जोडले गेलेलो नाही. मूलभूत हक्क व नागरिक स्वातंत्र्ये भारतीय संविधानात आपण दाखल करून घेतली, पण समाधानकारक स्वरूपात व्यवहारात ती कार्यान्वित झाल्याचे आढळत नाही. जनसामान्यांचे हक्क, त्यांची स्वातंत्र्ये जास्त करून पायदळी तुडवली जात असतात. या बाबतचे चित्र अलीकडच्या काही वर्षांमध्ये जास्त बटबटीत व निर्घृण बनत चालेले आहे. याचे एक महत्त्वाचे कारण असे की, स्वार्थ साधीत असतानाही, सत्ता उपभोगत असतानाही सभ्यतेची, सुसंस्कृततेची पथ्ये सांभाळण्याचे संस्कार धुपून जात आहेत. 'जागतिकीकरण' — 'उदारीकरण'च्या घडामोडीने धुपून जाण्याची प्रक्रिया जास्त गतिमान झाली. कारण, खाजगी अभिक्रमाला, नफाधारित बाजारपेठी व्यवहारांना खुला वाव याचा, स्वार्थ साधायला मोकळे रान असा लहानथोर, सर्वांनाच अर्थ लागला आहे.

लोकशाही राज्यव्यवस्थेचे आरोग्य ही गोष्ट सार्वजनिक जीवनात काही मूल्ये व संकेत, रीतिभाती व वागणूक खोलवर रुजलेली असण्यावर, यांच्या आधारे चालणाऱ्या जीवनाच्या सर्व क्षेत्रांत समर्थ स्वायत्त सार्वजनिक संस्था कार्यरत असण्यावर मुख्यत्वेकरून अवलंबून असते. राज्यसत्ता निरंकुश, बेबंद व निर्घृण न बनण्यासाठी यांची गरज असते. हे जाळे राज्यसंस्थेला उखडून टाकता येऊ नये इतकी सार्वजनिक संस्थांची पाळेमुळे जनजीवनात व लोकांच्या मनोधारणांमध्ये रुजलेली असायला लागतात. अशा संस्थांच्या कार्यामधून एक परंपराही निर्माण व्हायला लागते. केवळ संस्थांची संख्या हे गमक पुरेसे ठरत नाही. इंग्लंड-अमेरिकेसारख्या काही देशांमध्ये स्वायत्त सार्वजनिक संस्थांचे जाळेही आहे आणि भक्कम परंपराही निर्माण झालेल्या आहेत. भारतात ब्रिटिश राजवटीच्या काळात स्वायत्त सार्वजनिक संस्थांची उभारणी अनेक क्षेत्रांमध्ये तत्कालीन नेत्यांनी केल्याचे आपल्याला आढळते. एक निरोगी, सुदृढ, परंपराही आकारास येत होती. परकीय ब्रिटिश राजवटीवर अवलंबून नसावे ही दृष्टी व आग्रहही होता. दुर्दैवाने, स्वातंत्र्य मिळाल्यावर 'कल्याणकारी राज्य' व 'नियोजनबद्ध विकास' या दोन घडामोडींमुळे सरकारीकरणाचा विस्तार जसा वाढत गेला तसे सार्वजनिक संस्थांचे स्वायत्तपण क्षीण होत गेले, नव्या संस्थांची उभारणी स्वबळावर करण्याकडे दुर्लक्ष झाले आणि सर्व गोष्टी सरकारच्या हाती असाव्यात अशी 'समाजवादा'ची गैर व्याख्या केली गेली.

नागरिकत्व ही इतकी सवंग व सोपी गोष्ट नाही. तो एक गंभीरपणे पत्करण्याचा वसा आहे. हक्क आणि स्वातंत्र्याची भाषा करीत मागण्यांचे संघर्षात्मक राजकारण करण्यामधून नागरिकत्व व स्वायत्त नागरिक समाज (civil society) यांची निर्मिती होतेच असे नाही. समाजाच्या योग्य व सुदृढ










धारणेच्या संदर्भातील आपली कर्तव्ये पार पाडण्याची जबाबदारी उचलून, आणि त्या व्यवहारांद्वारा व्यवहारात/कारभारात लोकशाहीला आधारभूत मूल्ये, संकेत, रीतिभाती पाळण्यातून रुजणाऱ्या, बळकट होणाऱ्या या गोष्टी आहेत. राज्यसत्ता काबीज करण्याच्या उद्देशाने केलेले संघर्ष, लोकलढे, क्रांत्या यांनी प्रसंगी सत्ता हाती येते; पण त्यांमधून नागरिकत्व व नागरिक समाज यांची जोपासना क्वचितच होते. राजकीय पक्षांना सत्तेत रस असतो. वरील दोन गोष्टींमध्ये नसतो. नागरिकत्व व नागरिक समाज यांच्या संवर्धनाचे काम वेगळ्याच प्रक्रियेद्वारे घडवावे लागते. गांधींनी याबाबतीत सैद्धांतिक व लिखाण व कृतीच्याद्वारे केलेले योगदान अजोड आहे. त्या वाटेवरून वाटचाल करण्याची नितांत गरज आहे.

संगणक, इंटरनेटचे महाजाल, इ-कॉमर्स आणि, एकंदरीतच त्या दिशेने आपण आणखी पुष्कळ प्रगती केली तरी मानवी व प्राणीजीवन हे पृथ्वीच्या एकंदर जीवनधारणक्षमतेवर नेहमीच विसंबून राहणार. सर्व गोष्टी 'सिंथेटिक' (म्हणजे कारखान्याद्वारा रासायनिक संयुगांच्या स्वरूपात) निर्माण करण्याचे स्वप्न हे मृगजळच आहे. हीच गोष्ट जनुकीय अभियांत्रिकी/बायोटेक्नॉलॉजी यांच्यावर विसंबण्याबाबत खरी आहे. निसर्गसृष्टीचा, पृथ्वीच्या पर्यावरणव्यवस्थेचा सर्वांगांनी ऱ्हास होत राहील, पण विज्ञान-तंत्रविज्ञानाद्वारे आपण अधिकाधिक संपन्न जीवन जगू शकू हा भ्रम आहे, ही गोष्ट एव्हाना ध्यानात आली आहे.

माणसाचे पृथ्वीशी व निसर्गसृष्टीशी एकपदरी नाते नाही. केवळ भौतिक गरजा भागविणारी उत्पादने विपुल प्रमाणात निर्माण करण्यासाठी पृथ्वीवरील सर्व गोष्टींचा वापर करण्यापलीकडे कशाचा विचार करण्याची गरज नाही अशा भावनेने पैसा मिळविण्याच्या मागे लागलेल्या उद्योजकांचे जगभर वागणे होत आहे. पण हीच मंडळी देशोदेशी पर्यटनासाठी जाऊन अमाप पैसा खर्च करतात. यांना आकृष्ट करण्यासाठी केली जाणारी जाहिरातबाजी पाहिली तर, निसर्गरम्य, निवांत स्थळांची वर्णने करण्यावर, छायाचित्रे छापण्यावर भर किती असतो हे पाहण्यासारखे आहे. तात्पर्य, माणसाची जडणघडणच अशी आहे की, ज्यांना इंद्रियसुखे म्हणतात तेवढी मिळाल्याने माणसाचे आंतरिक समाधान होत नाही.

'जागतिकीकरण' — 'उदारीकरणा'चा सगळ्यात निर्घृण आघात पर्यावरणावर होत आहे. कारण सुखोपभोग वाढविण्यासाठी जगभरची संसाधने ताब्यात घेण्यासाठी मोठी चढाओढ आहे. या चढाओढीत जीवनाधार असलेल्या नैसर्गिक संसाधनांवरील तळागाळाच्या जनसमूहांची पकड सुटते आहे. साधी पिण्याच्या पाण्याची गोष्ट घ्या. आजच 'स्वच्छ, शुद्ध पाणी' बाटल्यात पॅकबंद करून विकले जात आहे, व याचा प्रसार सर्वत्र वाढत आहे. भारतातल्या बहुधा सर्व तालुक्यांच्या गावी दुकानांमध्ये अशा बाटल्या मिळतात. म्हणजे त्यांना खप आहे. नद्या, विहिरी, तळी, ओढे यांचे पाणी वाढत्या प्रमाणात प्रदूषित होत आहे, हे आपण रोज वर्तमानपत्रांमध्ये वाचतो. स्वतःचे आरोग्य जपण्यासाठी शिक्षित मध्यमवर्गीय माणसे घराबाहेर बाटल्यांतले पाणी पिऊ लागली आहेत. काही वर्षांनी अशी परिस्थिती येऊ शकते की, भारतीय जनतेची विभागणी बाटल्यांतले पाणी पिणारे लोक व प्रदूषित पाणी पिण्याचा धोका पत्करल्याखेरीज गत्यंतर नाही असे लोक, अशी होईल. स्वच्छ पाण्याचे खात्रीलायक स्रोत खाजगी उद्योजक या ना त्या प्रकारे ताब्यात घेतील. ही प्रक्रिया जंगले, शेतजमिनी, पशुधन अशा (खनिजांसह) सर्व नैसर्गिक संसाधनांच्या बाबतीत होऊ शकेल.

सामान्य लोकांच्या जीवनाचे आधार काढून घेणारी आणि मोठ्या प्रदेशांवरील निसर्गसृष्टीला उजाड करून टाकणारी प्रक्रिया विकासाच्या नावे भारतात वेगवान होत असल्याचे अनुभवाला येत आहेच.

मन उदास व विषण्ण करणारी पुढची गोष्ट अशी की, आपल्याच बांधवांपैकी अनेक देशोधडीला लागताना दिसत असले तरी, स्वतःची धन होत असेल तर, बेदरकारपणे त्यापोटी इतरांचे बळी द्यायला-घ्यायला मागेपुढे न पाहणारी माणसे आज थेट खेड्यापाड्यांत, लहानमोठ्या गावांमध्येही वाढताना दिसत आहेत.

माणसांच्या आटोक्याबाहेर असलेली भीषण नैसर्गिक व मानवनिर्मित आपत्ती — मोठ्या क्षेत्रावर पडणारा काही वर्षे टिकणारा दुष्काळ (अन्नाचे व पाण्याचे दुर्भिक्ष्य) —, रोगराईच्या मोठ्या साथी, महापूर, चक्रीवादळे, युद्धे–समाजाची नैतिक व्यवस्था धोक्यात आणतात. व्यक्तिगत आणि सामाजिक, दोन्ही पातळ्यांवर मानवजीवनाचा पाया सत्-असत्विवेक, चांगुलपणा, सौहार्द, व सहकार्य हाच असतो. दैनंदिन व्यवहारांमधून या मूल्यांचे उच्चाटन झाले की, समाजाची धारणा करणारी नैतिक व्यवस्था ढासळते. आज विकासवाद,



अनुक्रमणिका

सुखोपभोगांचा हव्यास यांच्या पोटी एक शोषक व विषम अर्थव्यवस्था जगभर उभारली गेली आहे. तिच्या तावडीतून पृथ्वीचा कोनाकोपराही अस्पर्श राहिलेला नाही. विज्ञान-तंत्रविज्ञान ही शक्ती माकडाच्या हातात कोलीत म्हणावे अशी विध्वंसक ठरत आहे.

शंभर कोटींच्या भारतामध्ये जागतिक अर्थव्यवस्थेची ही उधळलेली दौड माणसांचे रोजगार, त्यांचे पोटपाणी, त्यांची साध्ये, सुखसमाधान यांच्या बाबतीत धुमाकूळ घालीत आहे. ही व्यवस्था सगळ्याच गोष्टींकडे संसाधने, उत्पादनघटक (factors of production) म्हणून बघते. माणसेही तिच्या लेखी, त्यांची बुद्धी, कौशल्ये व श्रम यांच्या अंगाने, 'उत्पादनघटक' असतात, आणि उपभोक्ते म्हणूनही ती उत्पादित वस्तू विकत घेऊन त्यांचा फडशा पाडणारी 'साधने'च/यंत्रेच असतात. माणसाचे माणूसपण खच्ची करणारी, त्याला स्वतःच्या आंतरिक माणूसपणापासून परात्म (alienation) बनविणारी ही व्यवस्था मानवीय ऋणानुबंधाचे पर्यावरण उद्ध्वस्त करणारीच आहे.

मानवजातीच्या इतिहासावर आपण नजर टाकली तर एक विलक्षण, उद्बोधक तथ्य नजरेला पडते. ज्या प्राचीन सभ्यता (सिव्हिलायझेशन्स) नष्ट झाल्या त्या तत्कालीन अन्य संस्कृतींच्या तुलनेत अत्यंत प्रगल्भ, उच्चभ्रू, वैभवशाली व विकसित होत्या. म्हणजे असे की, त्या संस्कृतींमधील एक वरचा, पातळ सत्ताधारी वर्ग या स्थितीला पोचलेला होता. पण त्याच सभ्यतांमधील बहुसंख्य लोक हे 'शूद्र-अतिशूद्र' गणले जात होते आणि त्यांच्या माणूसपणाला उणेपण यावे अशा प्रकारचे जीवन त्यांच्या वाट्याला आलेले होते. या सभ्यता साम्राज्यवादी, शोषक व लुटारू वृत्ती प्रकट करणाऱ्या होत्या. त्यांनी युद्धे उत्पन्न केली, हिंसा माजवली, विकारांचा परिपोष केला आणि त्यांचे प्रदर्शनही मांडले. त्या नष्ट होण्याचे मुख्य कारण सामाजिक व नैतिक व्यवस्था (social and moral order) ढासळली हे होते. म्हणून हे महासंकट आहे.

हे महासंकट, धर्मसंकट न निवारता आल्याने काही प्राचीन संस्कृती नष्ट झाल्या. हे संकट नंतरच्या काळातही मानवी सभ्यतांवर कोसळत राहिलेले आहे. समकालीन इतिहासातले एक ठळक उदाहरण सोविएत रशिया आहे. इतरही काही उदाहरणे नजरेसमोर येऊ शकतात.

आज भारतात सामाजिक-राजकीय विघटनाची प्रक्रिया पुष्कळच पुढे गेली आहे. उच्चनीचभाव, विषमता आणि शोषण, नाना प्रकारची बंधने यांच्याविरुद्ध भारतातील जातिजमाती जागृत व संघटित होत आहेत, आणि लोकशाही राज्यव्यवस्थेच्या चौकटीत लाभ, अधिकार व सत्ता यांमध्ये स्वतःचा रास्त वाटा प्राप्त करण्यासाठी संघर्षरत आहेत, अशा विधायक अंगाने या सर्व प्रक्रियेकडे एका मर्यादेपर्यंत पाहता येते. **इंडिया : ए मिलियन म्युटिनीज नाऊ** या शीर्षकाचे पुस्तकच नोबेल पारितोषिकप्राप्त विख्यात कादंबरीकार नायपॉल यांनी लिहिले आहे. याच स्वातंत्र्योत्तर काळात इतरही गोष्टी घडत होत्या. यांपैकी एका घडामोडीची/प्रक्रियेची मीमांसा प्रख्यात दिवंगत अर्थशास्त्रज्ञ प्रा. वि.म. दांडेकर यांनी 'अंतर्गत साम्राज्यवाद-वसाहतवाद यांचा आविष्कार' या अंगाने केली होती. ही फार महत्त्वपूर्ण मीमांसा होती. तिचा डाव्या विचाराच्या मंडळींकडूनही प्रतिवाद केला गेला, कारण दांडेकरांनी अर्थव्यवस्थेतील संघटित कामगार-कर्मचारी वर्गांना, पांढरपेशा व्यावसायिक वर्गांना, नोकरशाहीला शोषक वर्गात आणि देशांतर्गत साम्राज्यसत्तेमध्ये, समाविष्ट केले होते, आणि त्याला तीव्र प्रतिक्रिया आली होती. आधुनिक समाजाचे व्यवहार हितसंबंधी, संघटनाधिष्ठित स्वार्थसाधनाचे स्पर्धात्मक स्वरूपाचे असतात, हा आधुनिकतेच्या गाभ्याशी असलेल्या व्यक्तिवादाचाच सामूहिक आविष्कार म्हणता येईल. या एकंदरीत अटीतटीच्या स्पर्धेमधून अनेकांची भरभराट व उत्कर्ष साधतो हे खरे. पण इतर कित्येकांना अस्थैर्याला, परिस्थिती ढासळण्याला सामोरे जावे लागते. यामुळे समाजातला फुटीरपणा व अंतर्गत कलह वाढत जातो. त्यातच जर भौतिक जीवनात बेरोजगारी वाढत असेल, उत्पन्न ढासळत असल्यामुळे असुरक्षित व अस्थिर वाटत असेल, गर्दी-गोंगाटमय जीवनामुळे, स्पर्धा तीव्र झाल्यामुळे सहनशीलतेवर असह्य ताण उत्पन्न होत असेल तर हिंस्रता वाढते. माणसे हिंसाचार करण्यासाठी निमित्ताला टेकल्यासारखी होतात. भारतात भाषा, धर्म, यांच्यामुळे उत्पन्न होणारे भेद व ताणतणावही भरीला आहेतच.

या सगळ्या कारणांमुळे भारतात एक अत्यंत स्फोटक व नाजुक स्थिती निर्माण झालेली आहे. यात्तच आपापले (आर्थिक व सामाजिक) स्वार्थ साधण्यासाठी हिंसेचा वापर करण्याची नीती काही पक्ष बुद्ध्या अवलंबीत आहेत. हिंदुत्ववादी, नक्षलवादी, इतरही काही आंतकवादी संघटना यांचे लक्ष्य त्यांच्या व्यूहरचनेनुसार वेगळी समाजव्यवस्था प्रस्थापित करण्याचे आहे. तसा त्यांचा दावा आहे. पण व्यवहारात त्यामुळे फुटीरपणा वाढत आहे आणि समाजाचे ऐक्य तुटत आहे.

अनुक्रमणिका

तत्ववेत्ते चार्ल्स टेलर यांनी म्हटले आहे की, सर्व मोठ्या लोकसंख्या असलेल्या, बहुजिनसी, व्यामिश्र समाजांमध्ये अनेक कारणांनी फुटीरपणा वाढविणारे भेद, ताणतणाव व कलह उत्पन्न होत असतात. आणि ही त्यांची स्वाभाविक स्थिती मानायला हवी. यामध्ये आज जातीजमातींच्या, लोकसमूहांच्या अस्सल (authentic) अस्मितांच्या प्रकर्षामुळे भर पडली आहे, व पडत राहणार आहे. यामुळे जो विघटनाचा धोका उत्पन्न होतो त्यावर मात करण्याचे, बृहत् व अनेकजिनसी समाजांच्या ऐक्यसंवर्धनाचे, ऐक्य दृढ राखण्याचे विशेष आव्हान कायम उपस्थित असते. भारताच्या संदर्भात ही गोष्ट फारच खरी आहे.

भेद, ताणतणाव, कलह-संघर्ष यांचे पूर्ण निर्मूलन करणे आणि एकमुखी ऐक्य — उदाहरणार्थ, भारतीय लोकसंख्येला त्यांच्या त्यांच्या विभिन्न भाषा/धर्म टाकायला लावून एकभाषिक/एकधार्मिक बनविणे प्रस्थापित करणे ही गोष्ट अशक्यही आहे आणि, टेलर असे म्हणतील की, अनिष्टही आहे. कारण दडपणूक, हिंसा, अत्याचार यांच्या निर्घृण वापरामधूनच असे निर्मूलन शक्य होणार आहे. 'शत्रू' विरुद्ध, प्रसंगी युद्ध उत्पन्न करून समाजाची एकजूट करू पाहणे हा प्रयोग काही वेळा केला जातो. पण तो फार काळ परिणामकारक राहात नाही. हे आव्हान झेलावयाचे तर सगळ्या समाजाला, भेद, ताणतणाव व कलह मर्यादांमध्ये राखत, त्याचे ऐक्य दृढ राखावयाला एका उच्च ध्येयाच्या, लक्ष्याच्या व अस्मितेच्या भोवती एकत्र आणता यावे लागते. ब्रिटिश राजवटीच्या काळात 'स्वातंत्र्य' हे असे ध्येय होते. स्वातंत्र्य, समता, न्याय, आर्थिक समृद्धी, सेक्युलॅरिझम अशा मूल्यांच्या पायावर एका नव्या समाजाची उभारणी करण्याचे स्वप्न (युटोपिया) हे भारतीय समाजाचे ऐक्य दृढ राखायला प्रेरक ठरेल इतके भव्यदिव्य आहे. पण असे ध्येय वा स्वप्न परिणामकारक व प्रेरक ठरण्यासाठी, आपण सगळे एक समाज आहोत ही प्राथमिक व पायाभूत भावना समाजात रुजलेली असावी लागते. ही भावनाच धुपून जाईल, आणि आपण कधी एका समाजाचे नव्हतो व आजही नाही ही भावना उत्पन्न होईल या प्रकारचे अस्मितांचे राजकारण-समाजकारण 'अस्सलते'च्या, 'सच्चेपणा'च्या नावाने जर जोपासले जात राहिले तर तो भारतीय समाजाचा द्रोह करणे ठरेल.

जगाच्या अनेकानेक देशांमध्ये भारत त्याचे मानाचे स्थान का घेऊ शकत नाही? त्याचा पुरुषार्थ दिपवून टाकणारा का होत नाही? आजच्या भारतीय समाजाकडे पाहिले तर येथील उच्चशिक्षित पांढरपेशा उच्चमध्यमवर्गाच्या ठायी आत्मविश्वासाचा अभाव, पाश्चात्यांसमोर गुडघे टेकण्याची गुलामीची व अनुकरणाची वृत्ती यांचा अलिकडच्या काळात प्रकर्ष होत चाललेला आढळतो. त्यामुळे गुणसंपदा, कौशल्ये, क्षमता यांबाबतीत कोणत्याही प्रकारे कमी नसून आपली अनेक क्षेत्रांमधील कामगिरी दुय्यम-तिय्यम स्वरूपाची राहिली आहे.

या अंगाने पाहिल्यास, भारतीय लोकांच्या आत्मविश्वासाचे व पुरुषार्थाचे जागरण करणे आणि समाजाचे उत्थान घडवून आणणे हे एक तातडीचे आव्हान आहे. आपले मोठे भाग्य असे आहे की, गेल्या दीडदोनशे वर्षाच्या काळात थोर व्यक्तींची अशी एक मालिकाच या देशात होऊन गेली. त्यांच्या व्यक्तित्व, चरित्र व जीवनकार्यापासून आपणास हे आव्हान झेलण्याची प्रेरणा व बळ प्राप्त होऊ शकते. आणि त्या अशा थोर व्यक्ती होत्या ज्या भारतातील सर्व जातिधर्मांच्या, भाषांच्या नि स्थानिक संस्कृतींच्या लोकांना बरोबर घेऊन जाण्याची गोष्ट करीत होत्या. ही परंपरा केवळ गेल्या दीडदोनशे वर्षांपुरती मर्यादित नाही. त्यात संतकवींपैकी पण अनेक व्यक्ती आहेत, आणि प्राचीन काळातील ऋषिमुनी व महात्मे पण आहेत. दुर्दैव असे की, आपण या थोर व्यक्तींच्याही नावांचा उपयोग आपापसातील फाटाफूट व हेवेदावे वाढविण्यासाठी करीत आहोत. बहुविध पण एकात्म असा आपला वारसा आत्मसात करून, व्यक्तिशः आपणास रुचेल त्या व्यक्तींपासून प्रेरणा घेऊन आपण निर्वैर वृत्तीने बंधुभाव जोपासत, एकजुटीने आपल्यासमोरील आव्हाने झेलण्यासाठी दृढसंकल्प करूया, असे मी आपणा सर्वांना नम्र आवाहन करतो आणि यासाठी आवश्यक ती आतंरिक शुद्धता आणि अंतःसामर्थ्य आपणा सर्वांना प्राप्त होवो अशी प्रार्थना करतो.

⌘⌘

## लेखक परिचय

❖ **श्री.मा. भावे** : प्राध्यापक, आय.आय.टी. पवई, मुंबई; गणित व तत्त्वज्ञान या विषयाचे ज्येष्ठ अभ्यासक. या विषयांशी संबंधित २५ शोधनिबंध प्रसिद्ध. शिक्षक चळवळीत सहभाग. **पत्ता** : ३३/२०, ४थी गल्ली, प्रभात रोड, पुणे ४११ ००४.







अनुक्रमणिका




# राष्ट्रांची श्रीमंती आणि गरिबी*

श्री.मा. भावे

**अमेरिकेच्या समृद्धीचा मागोवा**

(अ) औद्योगिक क्रांतीचे दोन टप्पे झाले. एक अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात अवतरला व दुसऱ्याची सुरुवात १९व्या शतकाच्या मध्याला झाली. पहिल्या टप्प्याचा शेवट झाला त्या सुमारास अमेरिकेची संयुक्त संस्थाने हा देश (यालाच आपण इथे थोडक्यात 'अमेरिका' म्हणून संबोधू) केवळ कच्च्या मालाचे उत्पादन करणारा देश होता. देशात भरपूर पिकाऊ जमीन, प्रचंड खनिज संपत्ती, विस्तृत जंगले, जंगी नद्या, नाना परीच्या वनस्पती आणि विविध प्रकारचे प्राणी यांचा उदंड साठा होता. मनुष्यवस्ती कमी असल्याने मजुरांची टंचाई होती. अशा स्थितीत या ना त्या उपायाने मनुष्यबळ उभे करावे लागते. संभाव्य आगंतुकांना आमिषे दाखवावी लागतात. फुकट किंवा स्वस्त जमीन, मोठा पगार, समाजात इभ्रतीचे स्थान किंवा काही हक्क वा अधिकार यांचे आश्वासन अशा स्वरूपाची ही आमिषे असतात. इंग्लंडच्या वसाहती म्हणून नांदताना व स्वतंत्र झाल्यावरही अमेरिकेने ही प्रलोभने लोकांपुढे ठेवली होतीच; पण तितक्याने भागेना तेव्हा आफ्रिकेतून गुलामांची आयात केली.

कच्च्या मालाचे मुबलक उत्पन्न काढणाऱ्या राष्ट्रांनीही अलोट औद्योगीकरण साधून उत्कर्षाचे शिखर गाठले. स्वीडन, कॅनडा, अमेरिका ही या वर्गातील राष्ट्रे होत. या राष्ट्रांनी हे कसे साधले याचा खुलासा करणारी एक उपपत्ती अर्थशास्त्रज्ञांनी मांडली आहे. "आतीरिक्त कच्च्या मालाची उपपत्ती" असे तिचे नाव आहे. तुमच्याकडे अपरंपार कच्चा माल आहे ना, मग त्याच्या निर्यातीवर भर द्या. त्याने स्वदेशाचे उत्पन्न वाढेल व वाढीव उत्पन्नामुळे पक्क्या मालाची मागणी वाढेल. वाढत्या मागणीप्रमाणे पुरवठा करण्यासाठी देशी कारखाने काढले जातील. या कारखान्यांना भांडवल लागेल ते वर सांगितलेल्या निर्यातीतून उभे राहील किंवा परकीय भांडवल येईल. हॅरॉल्ड इनेस याने या उपपत्तीचा पुरस्कार करून ती अनेक देशांच्या आर्थिक इतिहासाला लावून दाखविली.

पण लांडेस यांचे म्हणणे की, केवळ अनुकूल उदाहरणे घेऊन या उपत्तीची सिद्धता करता येणार नाही. हीच उपपत्ती ब्राझील, मेक्सिको, अर्जेंटीना या देशांत का लागू पडली नाही? खरे तर १८व्या शतकाच्या मध्याला या देशांची लोकसंख्या अमेरिकेच्या लोकसंख्येपेक्षा जास्त होती. त्यांची दरडोई संपत्तीही अधिक होती. तरीही औद्योगीकरणाच्या स्पर्धेत हे देश मागे पडले. बार्बाडोसचे उदाहरण घ्या. साखर पिकवणारा हा देश. १७०० साली या देशाचे दरडोई उत्पन्न ७३६ डॉलर्स तर अमेरिकेचे उत्पन्न ४९० डॉलर्स होते. डॉलरची स्थिर किंमत घेतली तर १९८९ साली बार्बाडोसचे दरडोई उत्पन्न ५३५० डॉलर्स आणि अमेरिकेचे दरडोई उत्पन्न १८३०० डॉलर्स होते!

(आ) आता कोणी म्हणतील की, अमेरिकेची निसर्ग-संपत्ती आणि ब्राझील किंवा बार्बाडोस यांची निसर्ग-संपत्ती या दोहोंची तुलनाच होऊ शकत नाही. अमेरिका समृद्ध होणार हे ईश्वरच बोलून चुकला होता. पण काही विद्वानांचे म्हणणे आहे की, अमेरिका व मेक्सिको किंवा ब्राझील यांच्या श्रीमंतीत पडलेल्या तफावतीचे स्पष्टीकरण इतक्या सोप्या मार्गाने होऊ शकणार नाही. अमेरिकेचा निसर्ग समृद्ध आहे, हे खरेच; पण त्या समृद्धीच्या विशिष्ट ठेवणीमुळे. तेथील समाज व संस्कृती यांना जे वळण मिळाले त्याची दखल घेतल्याखेरीज अमेरिकेच्या आजच्या श्रीमंतीचा पुरा खुलासा होणार नाही.

ज्या समाजात संपत्तीचे वाटप फार विषमप्रमाणात झालेले असते; तेथे अगदी थोड्या लोकांकडे गडगंज लक्ष्मी असते व बहुतेक समाज भिकेला लागलेला असतो; काही लोकांची अमाप चंगळ चालते आणि दुबळे लोक जुलमात पिचत असतात तेथे बदलाला किंवा सुधारणेला लागणारा हुरूप जन्माला येत नाही. धनत्तरांना सुधारणेची गरज वाटत नाही आणि भणंगांना आपण काही केले तरी आपल्या स्थितीत फरक पडणार नाही, याची खात्री असते. कधी मधी फुटकळ बंडाळ्या होतात. पण सत्ताधारी

---

* या लेखमालेतील हा चौथा व शेवटचा लेख आहे. पहिले तीन लेख अनुक्रमे ऑगस्ट २००२, सप्टेंबर २००२ व नोव्हेंबर २००२ या अंकात प्रसिद्ध झाले.
*– कार्यकारी संपादक*

अनुक्रमणिका






त्यांचा निःपात करतात. बहुसंख्य लोक पारलौकिक सुखावर श्रद्धा ठेवून चालू हलाखी निभावून नेतात.

अमेरिका व कॅनडा या देशांची स्थिति निराळी होती. अगदी वसाहतकाळी देखील मजुरांच्या टंचाईमुळे व यंत्रांच्या अभावामुळे प्रत्येक शेतकऱ्याची पिकाखालची जमीन थोडकी होती व तीपासून मिळणारे उत्पन्न गरजेपेक्षा फार जास्त नव्हते. मजुरीचे दर चढलेले होते. समाजात समता, लोकशाही, हुरूप किंवा उपक्रमशीलता यांचे वातावरण होते. मजुरीच्या महागाईमुळे प्रत्येक जमीनमालकाला स्वतःच जमीन कसावी लागे. कारूनारूंच्या अनुपस्थितीमुळे शेतीची अवजारे स्वतःलाच दुरूस्त करावी लागत आणि त्यात सोयी-सुधारणा घडवून आणाव्या लागत; प्रत्येक शेतकऱ्याची इच्छा अशी असे की, भांडवल लागले तरी चालेल पण यंत्राने माणसाचे काम करावे.

अमेरिकेतील वसाहती व इंग्लंड यांच्यातील दळणवळण अनियमित आणि वेळकाढू होते. तसेच अमेरिकेत इंग्लंडकडून आलेले लोक तेथील धर्मछळाला कंटाळून आल्याने इंग्लंडशी फटकून वागणारे होते. वसाहतींचा कल सुरुवातीपासूनच स्वावलंबी होण्याकडे राहिला होता. त्यांनी बहुतेक सर्व कामांना उपयोगी पडतील असे कारागीर शिकवून तयार केले. लोहार, चांभार, सुतार, गवंडी हे तर होतेच; पण धातू शुद्ध करण्यासाठी भट्टीवाले, अवजारे तयार करणारे कारू असे लोक वसाहतीच्या सुरुवातीपासूनच कामाला लागले होते.

वसाहतकालीन अमेरिकेत फोफावलेला दुसरा उद्योग होता शस्त्रे तयार करण्याचा. पिस्तुले, बंदुका, तलवारी, तोफा, दारूगोळा यांना भरपूर मागणी होती. रानटी जनावरे, आदिवासी, दरोडेखोर यांच्याशी सततचा झगडा चालल्याने हत्यारे सारखी लागत. अन्नाचा बराच पुरवठा शिकारीतून होई, कातड्याचे कपडे व जोडे होत. शिकारीसाठी बंदुका, भाले व तलवारी लागत. हीच शस्त्रे पुढे स्वातंत्र्यलढ्यात उपयोगी पडली. बहुतेक हत्यारांच्या कार्यशाळा उत्तरेकडील वसाहतींत होत्या. त्यामुळे १८६०-६५ या काळात जे यादवी युद्ध झाले त्यात उत्तरेकडील संस्थानांनी दक्षिणेतल्या संस्थानांचा पराभव केला.

अमेरिकेतील वसाहती स्वतंत्र झाल्या तेव्हा औद्योगिक क्रांतीचा पहिला टप्पा ऐन भरात होता व त्याच्या स्वागताची जय्यत तयारी नवीन राष्ट्राने केली होती.

इ) स्वातंत्र्यानंतर लवकरच अमेरिकेतील वस्त्रोद्योगाची भरभराट झाली. अगदी सुरूवातीला फारच थोड्या प्रमाणात सूत काढण्याची व कापड विणण्याची ऊर्जायंत्रे इंग्लंडमधून आयात केली गेली. पण त्यानंतर अमेरिकेतल्या कारागिरांनी त्या यंत्रांच्या उत्तम प्रतिकृती तयार केल्या व मूळ यंत्रांत सुधारणाही केल्या. सुधारणा प्रथम दर्शनी किरकोळ वाटल्या तरी त्यांचा परिणाम महत्त्वाचा होता. उदा. सूत कातण्याची ब्रिटिश यंत्रे चालवायला अवघड होती. अमेरिकन यंत्रे अर्ध कसबी स्त्री मजुरांनाही वापरता येत होती. कापड थोडे भरड निघे, पण उत्पादन जास्त होई. कोणत्याही ब्रिटिश यंत्रापेक्षा अमेरिकन यंत्रे १० टक्के अधिक उत्पादन घेत. १८२० सालीच अशी स्थिति आली की, अमेरिकन वस्त्रोद्योगाने इंग्लंडच्या वस्त्रोद्योगाला मागे सारले.

इंग्लंडमधील मजुरांपेक्षा अमेरिकेतील मजुरांना मिळणारी वागणूक खूपच चांगली असे. इंग्लंडमध्ये मुले व स्त्रिया यांना जवळ जवळ सक्तीने कामाला जुंपत. त्यामुळे मजुरांचा तुटवडा नसे. अमेरिकेत मजूर सहज उपलब्ध होत नसत. त्यांना जास्त पगार द्यावा लागे व त्यांच्या राहाण्या जेवण्याची व्यवस्था करावी लागे. अमेरिकेत गिरण्या स्त्री मजुरांसाठी वसतीगृहे बांधत; धार्मिक प्रवचने ठेवत; उद्बोधक ग्रंथ असलेली ग्रंथालये चालवीत.

अमेरिकेत घर-बांधणी उद्योगही उत्कर्षाला पोचला होता. वसाहतकाळापासून अमेरिकेत ठरीव मालाची तयार दारे व खिडक्या आयत्या मिळत असत. खिडक्यांना बसवायच्या काचाही प्रमाण मापाच्या कापून ठेवलेल्या असत. पण घरांच्या भिंती गवंडी विटांच्या किंवा दगडांच्या बांधीत आणि वर लाकडी छपरे बसवीत. पण १८३०च्या सुमारास अशी घरबांधणी देखील संपुष्टात आली. आता ठरीव मापाच्या कापून तासलेल्या फळ्याच विकत मिळू लागल्या. अशा चौकटीच्या सहाय्याने एकमेकांना जोडून प्रमाणित मापाच्या भिंती झटपट तयार होऊ लागल्या. या उद्योगामुळे नवीन प्रकारच्या यंत्रांचा संचच तयार होऊन उपयोगात आला. ऊर्जेवर चालणाऱ्या करवती, लेथ्स, रांधे, गिरमिटे अशी अनेक उपयोगी अवजारे उपलब्ध झाली बाजारपेठेला प्रमाणित (स्टँडर्डाइज्ड) वस्तूंचे वळण लागले. वस्तु ठरीव मापाच्या, ठरीव किंमतीच्या आणि योग्य त्या हमीच्या मिळू लागल्या एक सारख्या वस्तु यंत्रांच्या सहाय्याने मोठ्या प्रमाणात बनवता येतात, एका वस्तूच्या जागी दुसरी वस्तू नेमकी उपयोगात येते. त्यामुळे कारागिराचे व्यक्तिगत कौशल्य, गिऱ्हाइकाची आवड-निवड व किंमतीबद्दलची घासाघीस या बाबी बाजारपेठेतून नाहीशा झाल्या.








(ई) 'अमेरिकन उत्पादन पद्धती' हा नवीन वाक्प्रचार रूळला. अशी पद्धती अंमलात येण्याचे मूळ अमेरिकेच्या बाजारपेठेच्या स्वरूपात आहे. अमेरिकन बाजारपेठ देशभर एकाच स्वरूपाची होती. स्थानिक किंवा प्रादेशिक वैशिष्ट्ये किंवा चूषी यांना तिथे वाव नव्हता. प्रमाणित वस्तू स्वीकारण्याला जो मानसिक विरोध युरोपीय बाजारपेठेत आढळून येई, तसा विरोध अमेरिकेत नव्हता. अमेरिकेत कच्च्या मालाचा तुटवडा नव्हता; तुटवडा मजुरांचा होता. त्यामुळे उत्पादन पद्धती अशी बसवावी लागे की, तीत कारागिराच्या व्यक्तिगत कौशल्याला कमीत कमी वाव राहील. एका कामगाराच्या ठिकाणी दुसरा कामगार सहज काम करू शके. त्यामुळे एकाच उत्पादन प्रक्रियेचे बारके बारके तुकडे करून तेच ते काम यंत्राच्या सहाय्याने मजुरांकडून सातत्याने करून घेतले जाई. यात मालाची नासधूस होई – काटकसरीला अवसर नसे. पण काम झपाट्याने उरके, एकसारखे होई व भरकन उत्पन्न मिळे.

अमेरिकेच्या या उत्पादन-पद्धतीत बुजुर्ग यंत्रे, बुजुर्ग व्यवस्था यांना स्थान नव्हते. एखादे यंत्र कितीही महाग असले आणि कितीही परिश्रमाने त्याचे उपयोजन केले असले तरी त्यातून अधिक कार्यक्षम यंत्र बाजारात येताच हे जुने यंत्र मोडीत काढले जाई. जुने यंत्र काम करते आहे म्हणून वापरत रहा, अशा प्राथमिक काटकसरीला या उत्पादन पद्धतीत जागा नव्हती. ते कालबाह्य झाले ते तात्काळ संपले पाहिजे.

अमेरिकेने पायरी पायरीने आपले तंत्रज्ञान विकसित करत नेले. घड्याळे व बंदुका तयार करणारी यंत्रे करता येऊ लागल्यावर त्यांनी मनगटी घड्याळे व शिवण यंत्रे तयार केली. गवत काढण्याची व पिके कापण्याची यंत्रे बनवल्यानंतर कुदळ, औत, मळणी यंत्रे, चरक यांचे उत्पादन सुरू झाले. एका कामासाठी तयार केलेल्या यंत्राचा उपयोग थोड्या फरकाने दुसऱ्या कामासाठीही करता येतो. शिवणयंत्राने कपडे शिवता येतात त्याप्रमाणे जोडेही शिवता येतात.

(इ) तंत्रज्ञान व कारखानदारी यांची इतक्या झपाट्याने वाढ होण्याचे एक कारण अमेरिकेत समाजाची नव्हाळी हेही होते. या समाजात कोणतेच पूर्वग्रह, रिवाज किंवा कुलाचार यांना स्थान नव्हते. युरोपीय जमीनदाराला जमीन विकून कारखानदारीत भांडवल घालताना जिवावर येई. नवीन अवजारे विकत घेण्यापेक्षा शेतकऱ्याची आवड जमिनीचा नवा तुकडा खरेदी करण्याची असे. नवीन यंत्र येणे म्हणजे आपल्या नोकरीवर गदा असे युरोपीय कामगाराला वाटे. अशी कोणतीही मानसिक जळमटे अमेरिकेतील समाजाला नव्हती. युरोपात वर्गव्यवस्था अगदी जन्मावर ठरत नसली तरी बहुतेक लखोटबंद होती. गरिबांच्या वापरात असणाऱ्या वस्तूंपेक्षा निराळ्या वस्तू आपल्याकडे असण्यात आपला रईसपणा दिसतो, असे श्रीमंताना वाटे. अशा समाजात प्रमाणित उत्पादनाचा स्वीकार सहजपणे होत नाही. युरोपातही नव्हाळीचा काळ आला; पण तो दुसऱ्या महायुद्धानंतर. प्रत्येकाकडे मोटार हवी, प्रत्येकाकडे टेलीफोन हवा अशा तऱ्हेचा हव्यास युरोपच्या मनाला दुसऱ्या महायुद्धापूर्वी शिवला नव्हता. काही गोष्टी फक्त श्रीमंतांकडे असायला हव्या असे सर्व समाजाने मान्य केले होते. लोक पोस्ट ऑफिसात जाऊन फोन करीत. टपालानेच पत्रे पाठवीत. यामुळे धंद्याची गती मंदावते हे धंदेवाईकांना कळत असे; पण त्यात काटकसर आहे, असेही वाटे. पैसे खर्च करूनही श्रीमंत राहता येते, किंबहुना संपत्ती वाढते, हे अमेरिकेने जगाला शिकवले.

१८७० साली अमेरिकी अर्थव्यवस्था ही जगातील सर्वात मोठी व बलशाली अर्थव्यवस्था झाली होती. १९१३ साली अमेरिकेचे राष्ट्रीय उत्पन्न इंग्लंड किंवा जर्मनी यांच्या राष्ट्रीय उत्पन्नाच्या अडीच पट तर फ्रान्सच्या उत्पन्नाच्या पाच पट होते. दरडोई उत्पन्न इंग्लंड मधील दरडोई उत्पन्नाच्या १.२५ पट, जर्मनीच्या दरडोई उत्पन्नाच्या १.८६ पट तर फ्रान्सच्या दरडोई उत्पन्नाच्या १.७५ पट होते. अमेरिकेच्या उत्पादन व बाजार व्यवस्थेने, कुणाला आवडो व न आवडो, पण ज्यांच्या हावेला शेवट नाही अशा चंगळखोरांचे एक नवे जगच अस्तित्वात आणले होते. आज पर्यंत धनदांडगे किंवा कुलवंत यांची हौस मौज व चैन-चंगळ लोकांनी पाहिली होती. पण इतिहासात पहिल्यांदाच मनगटी घड्याळे, भिंतीची घड्याळे, सायकली, टेलीफोन, रेडिओ, घरगुती यंत्रे आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे मोटारी अशा सारख्या अपूर्वाईच्या वस्तु सामान्य मनुष्याच्या आवाक्यात आल्या. विक्रीव्यवसाया-तील नवीन युक्त्यांमुळे या चंगळवादाला प्रोत्साहन मिळाले. हफ्त्यावर खरेदी, ग्राहकाला खरेदीसाठी मिळालेली कर्जाची व्यवस्था, लहान-मोठ्या वस्तूंच्या आकर्षक याद्या, वस्तू परत घेण्याची अगर बदलून देण्याची सवलत, हमीपत्रे या अशा प्रकारच्या काही हिकमती. युरोपात व्यापाऱ्यांनी या युक्त्या वापरल्या नव्हत्या असे नाही. पण त्यांची सांगड घालून त्यांचा एकत्रित वापर अमेरिकेच्या बाजार पेठेत पहिल्यांदा केला गेला.



अनुक्रमणिका

जंगी चंगळ व ती भागवण्यासाठी जंगी उत्पादन. त्यातून प्रचंड नफा व पुनः चैनबाजीला भरती!

**जपान्यांची तऱ्हाच निराळी**

अ) युरोपीय साहसी खलाशांचा जपानशी संबंध १६ व्या शतकाच्या मध्यापासून आला. तेथपासून १६३९ सालापर्यंत स्पेन, पोर्तुगॉल, हॉलंड येथील व्यापारी व जपानी यांचे संबंध चांगले मैत्रीचे होते. युरोपीयांची घड्याळे, तोफा, बंदुकादी शस्त्रे, भूगोल व शास्त्रे यांचे ज्ञान या गोष्टींचे अप्रूप जपान्यांना वाटे. तर जपान्यांचे शौर्य, त्यांचा उत्साह व नवीन ज्ञान स्वीकारण्याची उत्सुकता यांचे कौतुक पाश्चात्यांना वाटे. जपानी धार्मिक बाबतीत कडवे नव्हते. ख्रिस्ती धर्माचा तिटकारा त्यांना वाटत नसेच पण कित्येक जपान्यांनी स्वखुशीने ख्रिस्ती धर्म स्वीकारला होता. १६१२ साली सुमारे एक कोटी ऐंशी लाख जपान्यांपैकी पाच लाख जपानी ख्रिस्ती झाले होते.

तथापि, पाश्चात्य व जपानी यांच्यातील सख्य १६व्या शतकाच्या अखेरीत विरत चालले होते. एक असे झाले की, डच लोक जपानात पोचले आणि त्यांनी ख्रिस्ती धर्मातील पंथभेदाची कल्पना जपान्यांना दिली. डच लोक प्रॉटेस्टंट तर स्पेन व पोर्तुगॉल येथील लोक कॅथॉलिक होते. डच लोक जपान्यांना सांगत की, तुम्ही कॅथॉलिकांच्या नादी लागाल तर गुलाम व्हाल. १५९७ साली जपान्यांनी एका स्पॅनिश जहाजावरील माल पकडला. तेव्हा त्या जहाजाच्या कप्तानाने स्पेनचे साम्राज्य केवढे विस्तीर्ण आहे त्याची कल्पना जपानी सुभेदाराला दिली. एवढ्याशा स्पेन देशाने इतके मोठे साम्राज्य कसे कमावले, हा प्रश्न त्या सुभेदाराने केल्यावर कप्तानाने सांगितले की, आम्ही लोकांना आधी ख्रिस्ती करतो, मग तो देश आपसूक आमच्या हाती येतो.

हा इशारा जपान्यांनी मनावर घेतला व ख्रिस्ती धर्माला विरोध करण्यास सुरूवात केली. अनेक ख्रिश्चनांना धमकी देऊन धर्म-त्याग करावयास भाग पाडले. काहींचा भीषण छळ केला व कित्येकांना जिवंत जाळून टाकले. १६३७-३८ साली शिंबारा या गावी ३७ हजार ख्रिस्त्यांच्या शिबिराला वेढा घालून त्यांचे शिरकाण करण्यात आले. ह्या झगड्यात सात हजार जपानी शिलेदारही मारले गेले. १६७१ सालापासून प्रत्येक जन्माला आलेल्या मुलाची नोंद झालीच पाहिजे व ते मूल शिंटो किंवा बौद्ध धर्माचे आहे, असे प्रमाणपत्र दाखल केले पाहिजे असा कायदा करण्यात आला. त्यामुळे ख्रिस्ती लोकांची संख्या वाढणे बंद झाले.

जपानी समाजाचे असे धार्मिक 'शुद्धीकरण' होत असतानाच परदेशी लोकांशी आलेला संबंध क्रमाक्रमाने तोडण्यात आला. परदेशी जहाजे दोन बंदरातच येतील असा नियम प्रथम आला, पण नंतर परदेशी जहाजांना जपानात येण्याची बंदी करण्यात आली. नंतर जपानी लोकांनी परदेशी जावू नये, असे ठरवण्यात आले. परदेशी गेलेल्या जपान्यांनाही परत येण्याची बंदी करण्यात आली. त्यामुळे फिलीपाईन्स, कोरिया, तैवान इथे गेलेले जपानी तेथेच कायमचे राहिले. पाश्चात्य पुस्तके, वस्तु, शस्त्रास्त्रे यांची आयात बंद केलीच पण चिनी व कोरियन पुस्तकांवर कडक पूर्व तपासणी बसविण्यात आली. परंपरागत समाजरचना गोठवून ठेवायची; सुधारणा, उठाव, बंडखोरी यांचा पुसटता हुंकारही दडपून टाकायचा असा निश्चय जपानी सरकारने केला.

आ) असा हा जपान देश होता तरी कसा? सर्व जपानवर मैजी या घराण्याची सत्ता होती, पण नावाला - आपल्याकडे जसे सातारचे छत्रपती मराठ्यांच्या सत्तेचे प्रमुख असले तरी सत्ता पेशव्यांकडे होती आणि राज्य निरनिराळ्या - शिंदे, होळकर, गायकवाड यांसारख्या सरदार- सुभेदारात विभागले होते, तशीच स्थिती जपानात होती. मैजी सम्राटाची सत्ता तेथील पेशवे, यांना शोगुन म्हणत, हे चालवीत. या शोगुनची नेमणूक सम्राटच करीत असे. सारा जपान सुमारे २५० सुभेदारांमध्ये वाटलेला होता. हे सुभेदार सम्राट व शोगुन यांची सत्ता देखाव्यापुरती मानत असले तरी बहुतेक स्वतंत्र असल्यासारखेच होते. सम्राट, सुभेदार व त्यांचे परिवार या सर्वांचा मिळून जपानचा सत्ताधारी वर्ग होता.

या सत्ताधाऱ्यांचा अंमल चाले तो शूर व इमानदार अशा शिलेदारांच्या बळावर. या शिलेदारांना सामुराई असे म्हणत. सामुराई व सत्ताधारी यांनाच फक्त शस्त्रे धारण करण्याचा अधिकार होता. या सामुराईंचा स्वतःचा जमीन-जुमला असे. त्यांना त्यांच्या मालकांकडून भत्ता मिळे. स्वामीशी इमान राखणे व त्याच्यासाठी तळहातावर शिर घेऊन लढणे, एवढेच त्यांना माहीत होते. तिसरा वर्ग सामान्य जनतेचा. यात शेतकरी, व्यापारी व कसबी-कारागीर असे तीन भाग होते. शेतीतील मुख्य पीक तांदुळाचे. उत्पन्नापैकी ३०टक्के तांदूळ सुभेदार कर म्हणून वसुल करी. त्यांतून सुभेदार स्वतःची कोठी चालवीच; पण पदरच्या सामुराईंना भत्ताही देई. जपानात या काळात चलनाचा उपयोग फारसा होत नसे. तांदूळ हेच विनिमयाचे साधन असे. पण व्यापारी तांदुळाचे चलनात रूपांतर करीत. बहुतेक








अनुक्रमणिका

बाजार हा सत्ताधारी व सामुराई यांच्या गिऱ्हाइकांवरच चालत असे. कारागीर व सत्ताधारी मध्यस्थ म्हणून व्यापारी काम करीत.

समाजातील अगदी तळाचा वर्ग अस्पृश्यांचा होता. जनावरांच्या व मनुष्यांच्या प्रेतांची विल्हेवाट लावण्याचे काम या अस्पृश्यांकडे असे. हे लोक संख्येने अगदी थोडे होते. जपानात आज अस्पृश्यता नाही. पण लग्नाच्या वेळी वधूच्या किंवा वराच्या वंशात कोणा अस्पृश्याचा शिरकाव झाला नव्हता ना, याची छाननी करण्यात येते.

असा हा चतुर्वर्गीय समाज होता. नियमाने नाही तरी व्यवहारात वंशपरंपरेनेच हे वर्ग कायम होते. दोन वर्गात बेटी व्यवहार क्वचितच होई.

इ) अशा या खिळवून ठेवलेल्या आणि उतरंडीची रचना असणाऱ्या समाजातही भावी आर्थिक उत्कर्षाची पाऊल चिन्हे दिसत होती. पाश्चात्यांना घालवून देण्यात आले व त्यांच्याशी संबंध उरला नाही हे खरे. डच लोकांशी अतिशय मर्यादित प्रमाणात दळण-वळण उरले होते. पण सुमारे शतकभर पाश्चात्यांशी जी लघट आली त्यातून काही हिकमती जपान्यांनी उचलल्या. पहिली म्हणजे तोफा-बंदुका करण्याचे कसब. आपण म्हणतो की, जपानी कारागीर वस्तूंची नक्कल करण्यात बाकबगार असतात. ही त्यांची बाकबगारी चारशे वर्षांपूर्वीही समजून आली होती. उत्तम तोफा-बंदुका करण्यासाठी दुय्यम दर्जाची बरीच कसबे हाती यावी लागतात. उदा. स्क्रू तयार करणे, ओतीव लोखंडी नळ्या करणे, वगैरे. ही कौशल्ये जपान्यांनी आत्मसात केली. दुसरी कला घड्याळे करण्याची. चीनने पाश्चात्य घड्याळे पाहिली होती. पण चिन्यांना तशी घड्याळे करणे जमले नव्हते. जपानी लोक घड्याळे बनवू लागले. इतकेच नव्हे तर त्यांनी पाश्चात्यांनाही मागे टाकले. जपानात दिवसाला व रात्रीला ठराविक तास वाटून दिले होते. त्यामुळे ऋतुमानाप्रमाणे. दिवसाच्या व रात्रीच्या तासांची लांबी कमी जास्त होई. जपान्यांनी अशी घड्याळे बनवली की, जी जरूरीप्रमाणे कमी-अधिक वेगाने धावतील! तिसरी कला चष्मे करण्याची. जपान्यांनी भिंगे तयार करण्याचे कसब हस्तगत केले होते.

पाश्चात्यांना हाकलून दिल्यानंतर जपानी सरकारने सुभेदारांना वठणीवर आणण्याचे ठरवले. सरकारने असा नियम केला की, राजधानीच्या ठिकाणी सुभेदाराने स्वतः राहिले पाहिजे आणि तो तिथे नसेल तेव्हा कुटुंब तिथे ठेवले पाहिजे. परिणाम असा झाला की, सुभेदारांचे ठाव व राजधानी यांच्यात कायमचे दळण-वळण सुरू झाले. रस्ते तयार झाले. रस्त्यांच्या मागोमाग मुक्कामांच्या सराया व त्यांच्या भोवतालचे बाजार आले. प्रवास म्हटला की, खर्च आला. प्रवासातील खर्चासाठी चलन लागते. एवढा तांदूळ कुठे ज़वळ बाळगणार? चलन वापरात आणले की, विनिमयाचा विस्तार व गती वाढते.

दोन ठिकाणच्या राहाण्यामुळे सुभेदार व सामुराई यांचा खर्च वाढला होता. त्यांना व्यापाऱ्यांकडून कर्ज घेण्याची वेळ वारंवार येऊ लागली. मात्र या बलदंड सत्ताधाऱ्यांकडून कर्जे वसूल करणे सोपे नव्हते. अधून मधून मध्यवर्ती सरकार सर्रास कर्जमाफीचा कायदा करी. अशा वेळी सावकाराचे दिवाळे वाजे. पण सत्ताधाऱ्याना सावकारांची गरज होती व सावकारांना कर्ज घेणारे लोक हवे होते. त्यामुळे कालान्तराने सावकार व ऋणको यांची समीकरणे स्थिरावली. पैसा, चैन व वाढीव खर्च यांच्या भुंग्यामुळे सावकारांनी आपल्या सुभ्याचे उत्पन्न वाढेल, असे उपाय करण्यास सुरुवात केली. त्यांनी पाटबंधाऱ्यांची योजना केली. पिकांच्या सुधारित जाती तयार केल्या. तांदुळाखेरीज वीट व रताळी ही पिके घेण्यात उत्तेजन दिले. खाणीव्यवसायाला सुरुवात करून लोखंड व तांबे शुद्ध करण्याचे कारखाने घातले.

या सर्वात भरभराट झाली ती वस्त्रोद्योगाची. इंग्लंड-प्रमाणेच जपानमध्येही वस्त्रोद्योगाने औद्योगिक क्रांतीचे तोरण उभे केले. जपानमध्ये पूर्वी अंबाडीच्या (हेम्प) धाग्याचे कापड करीत. कापूस १७व्या शतकाच्या सुरुवातीला आला व लवकरच कापसाच्या कापडाने बाजारपेठ काबीज केली. कापड उद्योगात सूत कातणे व सूत विणणे असे उत्पादनाचे दोन टप्पे होतात. या दोन्ही टप्प्यांतील उत्पादन तीन प्रकारांनी जपानमध्ये होत असे. शहरात सूत कातणाऱ्यांचे व विणकरांचे संघ (गिल्ड) काम करीत असत. या संघाचे नियम आपसात स्पर्धा होऊ नये या हेतूने केलेले असत. त्यामुळे महत्त्वाकांक्षी व्यापाऱ्यांना या नियमांत राहून उत्पादन वाढवता येत असे. असे व्यापारी शेतकऱ्यांना पेळू पुरवीत किंवा सूत पुरवीत व सूत कातून किंवा कापड विणून घेत. तिसरा प्रकार असा की, काही उद्योगपती ग्रामीण भागातच कार्यशाळा उघडून तिथे सूत कातण्याचा किंवा कापड विणण्याचा उपक्रम करीत. ग्रामीण भागात मजुरी कमी द्यावी लागे. त्यामुळे कालांतराने शहरातला वस्त्रोद्योग कमी होत गेला व ग्रामीण भागात मात्र राहिला.

औद्योगिक क्रांतीप्रवण देशाचे एक लक्षण म्हणजे शहरीकरण. १७व्या शतकाच्या मध्यापासून १९व्या शतकाच्या

मध्यापर्यंत जपानमध्ये अनेक शहरे विस्तार पावली आणि श्रीमंतीने बहरली. ओसाका, क्योटो ही जुनी शहरे होती. क्योटो ही राजधानी होती. नंतर ती टोक्योला गेली. पण या जुन्या शहरांचा दिमाख कायम होता. कसबी, कारागीर, कवी व लेखक, चित्रकार यांची वसती या शहरांत होती. एडो हे १० लाख वस्तीचे शहर होते. १८व्या शतकात ते जगातील सर्वात मोठे शहर असावे. त्यावेळी जपानची वस्ती दोन कोटी साठ लाख होती. एडो ही मोठी बाजारपेठ होती. उद्योगाचे केंद्र होते. ज्ञानभांडार होते. आणखीही कितीतरी होते. शहरीकरणाचा स्वाभाविक परिणाम म्हणजे व्यापार-दळणवळण व विनिमयादी व्यवहारातील चटपटीतपणा आणि नवीन तंत्रांच्या योगाने येणारी कार्यक्षमता. जपानमध्येही वस्तूंचा विमा, बँका, धनादेश, विनिमय केंद्रे या व्यवस्था निर्माण झाल्या.

ज्ञानोपासना हे प्रगतीच्या मार्गावरील समाजाचे चिन्ह आहे. जपानने पाश्चात्यांशी संबंध तोडून टाकले तरी देशिमा नावाच्या गावाच्या एका गल्लीत डच लोकांना राहयला परवानगी होती. जपानातील ज्ञानपिपासू तरुणांनी या डचांकडे जाणे-येणे ठेवले होते. त्यांच्या पासून शास्त्रीय ज्ञान घ्यायला सुरवात केली होती. अशा नवशिक्या तरुणांच्या खटपटीमुळे जपान सरकारने परदेशी पुस्तकांवरील बंदी शिथिल केली. ख्रिश्चन धर्माचा संबंध नसणारी विलायती पुस्तके जपानमध्ये आयात होऊ लागली. काही पंडितांनी या डच पुस्तकांचे जपानीत अनुवाद केले. पाश्चात्य वैद्यक, युद्धविद्या, गणित, भौतिकी अशा विषयांचा अभ्यास युरोपीय पुस्तकांवरून सुरू झाला. आपल्या पारंपरिक ज्ञानातील त्रुटी हे जपानी विद्वान दाखवून देऊ लागले.

ई) जपानमध्ये सम्राटाच्या आधिपत्याखालील मध्यवर्ती शासनयंत्रणा असली, तरी प्रत्यक्षात जपानची विभागणी निरनिराळ्या २५० सुभ्यात झाली असून त्या सुभ्यातील सुभेदारच तेथे सर्व सत्ताधारी असे. या सुभेदारांपैकीच एखाद्या सुभेदाराची नेमणूक 'शोगुन' म्हणजे सेनापती म्हणून होई व तो मध्यवर्ती सत्ता चालवी. सम्राट हा नावादाखलच असे. जपानमध्ये राज्यक्रांत्या अशा झाल्याच नाहीत. इतिहासाला माहीत आहे तेव्हापासून एकच्या एकच घराणे सम्राटपदावर आहे. ११८० साली शोगुन पद्धती अंमलात आली. या शोगुनांनीच सतराव्या शतकाच्या मध्यापासून जपानची दारे पाश्चात्यांना बंद केली व जपानी समाज लखोटबंद पद्धतीने १९व्या शतकाच्या मध्यापर्यंत सांभाळला.

आता या बंदिस्त समाजातही आर्थिक फेरबदलांमुळे सामाजिक अभिसरण होऊ लागले होते. कंगाल झालेले सामुराई श्रीमंत व्यापाऱ्यांच्या मुलींशी लग्ने करून स्वतःला सुबत्ता आणू इच्छित होते. काटकसर व कष्ट यांच्या सहाय्याने गबरगंड झालेले शेतकरी समाजात इभ्रत मिळावी म्हणून सत्ताधाऱ्यांशी स्पर्धा करीत होते. सुभेदारांना तोफा-बंदुका चालवणाऱ्या कवायती पलटणी पदरी हव्या होत्या. सामुराईंना या नव्या लष्करी शिस्तीचा कंटाळा होता. त्यामुळे सुभेदारांनी शेतकऱ्यांच्या पलटणी उभारल्या व सामुराईंच्या मक्तेदारीला धक्का दिला. सारांश, शोगुनच्या हुकुमा-फतव्यांना न जुमानता समाजात फेरफार होतच होते.

इकडे पाश्चात्य राष्ट्रे जपानच्या बंदरांवर धडका मारत होती. आपल्या व्यापाराच्या विळख्यातून जपान मोकळा राहातो याचे शल्य त्यांना बोचत होते. या पाश्चात्य व्यापारी काफल्यांची व त्यांच्या बरोबर आलेल्या लष्करी जहाजांची स्थानिक सुभेदारांशी गाठ पडून लढाया होत. तोफांच्या धडाक्यात जपानी बंदरांचा विध्वंस होई व स्थानिक सुभेदाराची दाणादाण उडे. शोगुनला नाक मुठीत धरून पाश्चात्यांशी अवमान करून घेणारे तह करावे लागत. हे तह सुभेदार मानत नसत. असा एकच गोंधळ चालला होता. त्यातून शोगुनी राजवट बदनाम होत होती. शेवटी १८६८ साली सुभेदारांनी असे ठरवले की, शोगुनची पद्धत रद्द करायची व मूळ सम्राट घराणे जे मैजी त्याच्या हाती सत्ता सोपवायची. या घटनेला 'मैजीची पुनर्स्थापना' असे म्हणतात.

मैजींच्या पुनर्स्थापनेमुळे आजवर संकीर्ण स्वरूपात राहिलेले पण राष्ट्रउभारणीसाठी आवश्यक असणारे जपानी समाजातील गुण जे शौर्य, स्वामिनिष्ठा, स्वकार्यतत्परता, स्वार्थनिरपेक्षता त्यांना केंद्रबिंदू लाभला व जगाच्या मंचावर राष्ट्र म्हणून आपल्याला मानाची भूमिका निभवावयाची आहे, असा नवा हुरूप संचारला. नवीन प्रशासनाने राष्ट्राची एकात्मता बळकट करण्याचे जाणीवपूर्वक प्रयत्न सुरू केले. सुभेदाऱ्या नाहीशा होऊन केंद्रीय शासन सरळ रयतेपर्यंत जाऊन पोचले. सरकारने टपालखाते सुरू केले. जुनी कालमापन पद्धती (जीत कमजास्त लांबीचे तास असत) रद्द करून देशभर एकच कालमापन सुरू केले. सरकारी शाळा काढून मुलामुलींना शिक्षण द्यायला सुरुवात केली. सारा जपान साक्षर करण्याचा विडा उचलला. या शाळातून मुलांच्यात शिस्त, वक्तशीरपणा, आज्ञाधारकता, सम्राटाविषयी पूज्यबुद्धी हे गुण रुजावेत अशी दक्षता घेतली. प्रत्येक पुरुषाने काही काळ सैन्यात नोकरी केलीच पाहिजे, अशी सक्ती करण्यात आली. त्यामुळे सामुराईंचे महत्त्व संपुष्टात आले. त्याना मासिक

भत्ता मिळे; त्याच्या ऐवजी एक रकमी नुकसान भरपाई देण्यात आली. सामुराई हा वर्गच नाहीसा झाला.

सामुराई काय किंवा सुभेदार काय यांनी स्वतःला काही सहजी रद्दबातल करून घेतले नाही. या आधुनिकीकरणाचा ओकुबो तोशीमिची नावाचा पुढारी होता. तो देशाचा गृहमंत्री आणि आर्थिक नियोजनाचा मुख्य होता. सामुराईंनी त्याचा १८७८ साली खून केला. आणखीही काही खून या काळात झाले. सहकारी नोकरास व श्रीमंत लोकात पाश्चात्य पोशाख घालण्याचा रिवाज पडत चालला होता. त्यावर सम्राटाने बंदी घालावी असा अर्ज सनातनी लोकांनी दिला होता.

पाश्चात्यांनी जपानवर जबरदस्ती करून जे अपमानास्पद तह लादले होते. त्याचा संताप जपानी लोकांना आला होता. परंतु या गोष्टीचा वचपा काढायचा तर पाश्चात्त्यांसारखेच प्रबळ होणे आवश्यक होते. हे सामर्थ्य मिळवण्यासाठी पाश्चात्यांची सैनिकी व प्रशासनिक कौशल्ये अंगिकारली पाहिजेत हे जपान्यांनी ओळखले होते. यासाठी त्यांनी पाश्चात्य तज्ज्ञ आणवलेच पण आपल्याकडील होतकरू व हुशार तरूण परदेशी पाठवले व तेथील उत्पादन क्रियेची, तंत्रज्ञानाची आणि आर्थिक व्यवहारांची सूक्ष्म पाहाणी करवली. जर्मनीतील लष्करी व मुलकी संरचना आपल्या मनोवृत्तीला अनुरूप आहे असे ठरवून त्यांनी जर्मन पद्धतीवर आपल्या लष्कराची व कारभाराची रचना केली.

इ) मैजींची पुनर्स्थापना होण्याच्या आधीपासूनच हस्तोद्योगाच्या तत्त्वावर चालणारा जपानी वस्त्रोद्योग भरभराटीला आला होता, हे आपण पाहिलेच आहे. या उद्योगात राबणाऱ्या स्त्रिया इतक्या कष्टकरी होत्या आणि त्या इतक्या कमी पगारावर काम करीत होत्या की, ऊर्जा यंत्रे बसविण्याची जरूरच जपानी उद्योगपतींना वाटली नाही. पुढे जपानी सरकारने पाणचक्कीच्या गतीवर चात्या फिरवून सूत काढणाऱ्या गिरण्या चालू केल्या. एका गिरणीत वीस हजार चकत्या एका वेळी फिरू शकत. सुताचा हस्तोद्योग या स्पर्धेला तोंड देऊ शकेना. वाफेच्या यंत्रावर सूत काढणे व माग चालवणे या गोष्टी १८९० नंतर जपानात आल्या. याला कारण भांडवलाची टंचाई हे नसून अशा यांत्रिकीसाठी लागणारे व्यवस्थापन-कौशल्य जपानकडे नव्हते, हे आहे. जपानी सरकारने पाणचक्कीवर चालणाऱ्या गिरण्या व्यापाऱ्यांना विकल्या व त्यांनी बाष्पयंत्रे वापरण्यास सुरुवात केली. जपानी वस्त्रोद्योग त्यानंतर झपाट्याने वाढत गेला. १८८६ साली जपानला लागणाऱ्या सुतापैकी ६२टक्के सूत आयात केले जात होते. १९१३ साली अशी स्थिती आली की, जगात एकूण निर्यात होणाऱ्या सुतापैकी चौथा हिस्सा सूत जपानातून निर्यात होत होते! इथे हेही लक्षात घेणे जरूर आहे की, युरोपीय राष्ट्रांनी लादलेल्या तहांमुळे जपानी उद्योगाला परकीय व्यापाऱ्यापासून कोणतेच संरक्षण नव्हते.

जपानमध्ये औद्योगीकरणाला सुरुवात झाली तेव्हा युरोप-अमेरिकेत औद्योगिक क्रांतीचा दुसरा टप्पा सुरू झाला होता. स्पर्धेत उशीरा उतरणाऱ्या राष्ट्राला आधीच्या समाजांनी केलेल्या प्रगतीचा लाभ मिळत असतो. १८९० साली जपानने बाष्पयंत्रांच्या उपयोगाला सुरुवात केली व १८९६ साली जपानी उद्योगात वीज-ऊर्जेचा प्रवेश झाला! १८९६ पर्यंत टोकियो, क्योटो, कोबे, ओसाका ही शहरे विद्युत-दीपांनी झगमगत होती. १९२० साली एकूण कारखान्यांपैकी ५२.३ टक्के कारखाने विजेवर चालत होते. वीज-ऊर्जेच्या क्षेत्रात अमेरिका व इंग्लंड हे देशही जपानच्या मागे पडले होते.

जेव्हा चेव येऊन एखादा समाज जागतिक स्पर्धेत उतरतो तेव्हा त्या समाजाला फार धडपड करावी लागते; कष्ट उठवावे लागतात व निग्रह करावा लागतो. औद्योगिक क्रांतीच्या काळात प्रगतीसाठी मोठे मूल्य समाजाला चुकवावे लागले. जपानमधील हुशार व होतकरू तरूण युरोपात व अमेरिकेत शिकायला गेले. तेथील सुखे, मौजमजा, मोठा पगार व ऐश्वर्य यांना तुच्छ लेखून ते स्वदेशात परतले आणि देशी कारखानदारीची पायाभरणी त्यांनी केली. जपानने परदेशी तंत्रज्ञ मानले नाहीत; स्वतःच्या खडतर मार्गाने तंत्रज्ञानाचा अभ्यास केला आणि पाश्चात्य तंत्रज्ञानाला अनुरूप वळण दिले. जी वाटचाल करायला इंग्लंडला दोनशेहून जास्त वर्षे लागली होती ती प्रगती जपानने पन्नास वर्षात घडवून आणली. १८७० ते १९२० या अर्धशतकात जपानी समाज कठोर व व्रतस्थ जीवन जगला. १९३० सालच्या एका जपानी क्रमिक पुस्तकात म्हटले होते, 'स्वतःची देशभक्ती आचरणात आणण्याचा सोपा मार्ग म्हणजे दैनंदिन जीवन व्रतस्थपणे जगणे हा होय. आपल्या कुटुंबाचा योगक्षेम सुखाने चालवणे व आपल्या कार्यस्थळी अंग मोडून काम करणे, हीच देशभक्ती".

ज्यांना वेठीला धरून कामाला लावता येते असे दोन घटक म्हणजे स्त्रिया व मुले. प्रगतीच्या वाटेवर धापावून पळताना सगळ्यात जास्त हाल या दोन घटकांनी सोसले. शेतकऱ्यांच्या लेकी-सुना आठवडेच्या आठवडे, वर्षामागून वर्षे एकही सुट्टी

न घेता सूत काढण्याचे व कापड विणण्याचे काम करीत. कणा-कणाने पैसा गोळा करीत. झाड्यास जायचे असल्यास मैल मैल धावत जाऊन आपल्या शेतावर प्रातर्विधी उरकीत, कारण शेताला खत मिळाले पाहिजे. बाळंत झालेल्या स्त्रियांना मुलांना पाजण्यासाठी देखील वेळ दिला जात नसे. सूत कातायला लागत. मुलाची काळजी मोठी भावंडे घेत. म्हाताऱ्या माणसांकडे खायला कहार म्हणून पाहिले जाई. दुर्लक्ष करून निकालात काढा त्यांना! अशा दया-माया-शून्य आणि कोरड्या व कठोर वृत्तीने जपानने उद्योगाची उपासना केली.

नंतर कापडाच्या गिरण्या आल्या. तेथे बायकांचे कळपच्या कळप रात्रंदिवस राबत असत. पहाटे दिवस उजाडण्यापूर्वीच कामाला सुरुवात होई व रात्री दहा पर्यंत काम चाले. मग दोन यंत्रांच्या मधल्या जागेत एखादे रकटे आंथरून त्या झोपत. या कामासाठी त्याना महिन्याला चार येन इतका पगार मिळे. त्या काळात भारतीय गिरणी कामगाराला याच्या पाऊणपट काम करून दुप्पट पगार मिळत होता. खेडेगावातले व शेतावरचे आयुष्य याहून खडतर असल्याने गिरणीत काम ही गोष्ट कामगार स्त्रियांना बरीच वाटे.

स्वामिनिष्ठा, अंग मोडून काम करण्याची तयारी, काटकसरी राहाणी हे गुण जपानी समाजात परिवर्तनाचा उदय होण्यापूर्वीपासून वसत होते. थक्क करणारा आर्थिक विकास घडवून आणायला ही गुणवत्ता उपयोगी पडली. इतर समाजात अशा हालांविरुद्ध दंगे झाले असते व लोकांनी कारखाने जाळून टाकले असते. परंतु यावरून कोणी असे समजू नये की, पारंपरिक सद्‌गुण आर्थिक प्रगतीच्या उपयोगाला येतात. आजचे सद्‌गुण उद्याच्या परिस्थितीत सद्‌गुण ठरतीलच असे नाही. इतिहासाचा दाखला तसा नाही. मैजी पुनःस्थापने-नंतर जपानने निश्चय केला की, आपण पाश्चात्यांची गुर्मी उतरवायची मग त्यासाठी सनातन परंपरा मोडीत काढावी लागली, लागेल ते कष्ट सोसावे लागले तरी हरकत नाही. या निश्चयात जपानच्या प्रगतीचे बीज आहे.

## मुसलमानी मुलुखाची मुलखावेगळी गोष्ट

अ) इस्लाम हा धर्म आणि इस्लामी संस्कृती यांची नीट माहिती असल्याखेरीज मुस्लिम देशांच्या वर्तमानकालीन अर्थकारणाची संगती लागत नाही. ६२२ साली महम्मद पैगंबर यांनी मक्केहून मदिनेस स्थलांतर केले तेव्हापासून अरब योद्धयांना स्वधर्माच्या प्रसाराचा चेव आला आणि पुढील हजार वर्षात त्यांनी पश्चिमेला स्पेन व मध्य फ्रान्स ते पूर्वेला फिलिपाईन्सपर्यंत इस्लामचा झेंडा फडकाविला. धर्माशी कडवे इमान आणि धर्मापासून मिळविलेली प्रेरणा यांचा हा जो स्फोट झाला, ती या हजार वर्षाच्या इतिहासातील लक्षणीय घटना होती. इस्लामचा विस्तार थांबला आणि युरोपातील देशांची साम्राज्ये उदयाला आली. पण मुसलमानी विस्तारवाद व साम्राज्ये यातील फरक असा होता की, धर्मप्रसार हे युरोपीय साम्राज्यांचे उद्दिष्ट नव्हते. पोर्तुगॉल व स्पेन यांनी धर्मप्रसार केला खरा पण आर्थिक लाभ हे त्यांच्या साम्राज्यांचेही प्रधान उद्दिष्ट होते. त्यामुळे कोठेही अडथळा आला किंवा विरोध आला की, युरोपीय देशांची विस्तारकांक्षा विसावा होई. मुसलमानी धर्म प्रसारकांच्या दृष्टीने धर्म फैलावण्यास खीळ बसणे म्हणजे इतिहास कुंठित होणेच. त्यामुळे अल्लाचे पाईक हार मानण्यास तयार नसत.

इस्लामच्या अशा कडव्या सैनिकांना देखील पाश्चात्यांच्या अर्थमूलक साम्राज्यविस्तारापुढे हार का खावी लागली? इस्लामी समाजात लहानसा अभिजनवर्ग व त्यांनी ज्यांना लुटावे, लुबाडावे अशी बेसुमार लाचार प्रजा ह्या प्रकारची विभागणी झालेली दिसते. या अत्यल्प उच्च वर्गाच्या हाती अमर्याद सत्ता, त्यांना कोणतीही अत्याचारी कृत्ये करण्यास मोकळीक, त्यांच्यावर लगाम काय तो कधी-मधी सत्ताधीशाला येणाऱ्या उपरतीचा! या उलट प्रजेला कोणताही हक्क नाही, मालमत्तेची सुरक्षितता नाही, त्यांच्या कपाळी फक्त कष्ट व सत्ताधाऱ्यांची करूणा भाकणे. बगदादच्या एका खलिफाने म्हटले होते की, "तो मनुष्य खरा भाग्यशाली की, ज्याला राहायला मोठे घरे आहे, सुंदर बायको आहे, कनवटीला बक्कळ पैसा आहे, जो आम्हाला ओळखत नाही व ज्याला आम्ही ओळखत नाही!" अर्थ स्पष्ट आहे की, रयते पैकी कोणाला सुखात राहायचे असेल, तर त्याने सत्तेपासून स्वतःला लपवून ठेवले पाहिजे.

तुर्की साम्राज्याचे उदाहरण या दृष्टीने उद्‌बोधक आहे. एके काळी या साम्राज्यात दक्षिण-पूर्व युरोपचा प्रदेश, काळ्या समुद्राच्या भोवतालचा भाग, पश्चिम आशियातील इराक, सीरिया, जॉर्डन, अरबस्तात व लेबॅनॉन, आफ्रिकेतील ईजिप्त, ट्युनिशिया व आल्जिरिया इतक्यांचा समावेश होत होता. एवढा विस्तृत प्रदेश काही सुलतानाच्या – ज्यास पुढे खलिफा असेही म्हणत – प्रत्यक्ष अंमलाखाली होता असे नाही पण कमी-जास्त सामर्थ्याच्या धाग्यांनी तो मध्यवर्ती सत्तेशी जोडलेला होता. आपल्याकडील मोगल साम्राज्याप्रमाणेच या साम्राज्यालाही दोन

दोष भोवले. पहिला हा की, सम्राट पद वंशपरंपरेने चालत असल्याने सत्तेवर येणारी व्यक्ती कर्तृत्वशाली असेलच याची खात्री देता येत नसे. दुसरा म्हणजे प्रत्येक वेळी वारसा हक्कावरून भांडणे होत या दुसऱ्या धोक्यावर तुर्की राजघराण्याने असा तोडगा काढला होता की, दर पिढीचा एकच वारस जिवंत ठेवायचा व बाकीच्यांना रेशमाच्या दोऱ्याने गळा आवळून ठार करावयाचे. फक्त मुलालाच नाही तर त्याच्या आईला देखील! जो वारस जिवंत ठेवला जाई, त्याला जनानखान्यात अगदी जपून वाढवले जाई. त्यामुळे उत्तर काळात असे झाले की, गादीवर येणारा सुलतान निष्फर्तृक निघून सुलतानाला ताब्यात घेण्यासाठी दरबारातील पक्षापक्षात चुरस चाले.

तुर्कांचे साम्राज्य विस्तीर्ण झाल्यावर त्याचे प्रशासन चालवायला मूळ तुर्की टोळीतील माणसे संख्येने कमी पडू लागली. तेव्हा तुर्कांनी साम्राज्यातील ख्रिस्ती लोकांवर अशी सक्ती केली की, प्रत्येक कुटुंबाने एक मुलगा राज्यासाठी द्यावा. त्याला मुसलमान करून वाढविण्यात येई व राज्याच्या सेवेत लहान-मोठ्या पदावर त्याची नेमणूक होई. कालांतराने तुर्की साम्राज्य हे तुर्कांचे असे नावालाच उरले. खुद्द तुर्क म्हणजे अडाणी, अर्बुज असा लौकिक पसरला. या मुसलमान करून वाढवलेल्या ख्रिस्तांना कोणी तुर्क म्हणून ओळखेना! जी गोष्ट मुलकी प्रशासनाची तीच सैन्याची. तुर्की सुलतानांनी खास विश्वासू म्हणून परदेशी गारद्यांचे शरीर-संरक्षक-पथक उभे केले. हे गारदी पुढे इतके माजले की, त्यांना राजधानीतून काढून टाकण्यासाठी सैन्याला तोफांचा माराच करावा लागला. त्यात सहा ते दहा हजार गारदी मेले.

इकडे तुर्कांची – म्हणजे साम्राज्याच्या सत्ताधाऱ्यांची - ज्ञानोपासना व उद्योगशीलता आटत चालली होती. या दोन्ही गोष्टींची उत्तेजनपूर्वक जोपासना करावी लागते. तसे प्रयत्न राज्यकर्त्यांकडून झाले नाहीत. पाश्चात्यांच्या तोफा पल्लेदार होत्या. त्या तोफखान्याशी तुर्की तोफखान्याचा नित्याचा संबंध किंवा संघर्ष होता. पण तुर्कांकडे तोफा ओतणारे कारागीर तयार झाले नाहीत. पाश्चात्त्यांकडून जिंकून घेतलेल्या तोफा उडवून दाखवतील असे गोलंदाजही तुर्कांकडे नव्हते. जे भूदलाचे, तेच नौदलाचे झाले. १५९३ साली एक इंग्रजी जहाज इस्तंबूल बंदरात आले तेव्हा तुर्की दरबारी लोक आचंबित झाले. ८३ तोफा घेऊन व ३००० मैल इंतर तोडून एखादे जहाज येऊ शकते, हेच त्यांना पटेना!

तुर्क व युरोप यांच्यातील व्यापारही तुर्कांच्या बाजूने आतवट्ट्याचा होता चालला. १७व्या शतकाच्या अखेरीपर्यंत अशी स्थिती होती की, तलम कापड, तयार गालिचे, कशिदा केलेले उंची कापड, चिनी मातीची गुळगुळीत भांडी असे नवलाईचे आणि तयार जिन्नस युरोपात जावयाचे व त्याच्या बदल्यात धातू, गुलाम व सोने यांची आयात व्हायची. आता लाट उलटली. तुर्कांकडून सुकामेवा, मसाल्याचे पदार्थ, कापूस व धान्य असा कच्चा माल युरोपला जाऊ लागला व युरोपातील तयार वस्तू आयात होऊ लागल्या. एके काळी तुर्कस्तानात कागद व तलम रेशमी कापड तयार होई व युरोपात पाठवले जाई. आता मात्र या जिन्नसा युरोपातून तुर्कस्तानात आयात होऊ लागल्या. तरी मुसलमानांची सर्वात मोठी चूक म्हणजे त्यांनी छपाईचा स्वीकार केला नाही, ही होय. छपाईचा धंदा इस्लामला बट्टा लावणारा आहे व छपाईच्या द्वारे पाखंड पसरेल अशी त्यांना भीती वाटे. खुद्द इस्तंबूलमध्ये छापखाने होते, पण ते ख्रिस्ती किंवा ज्यू यांच्या मालकीचे होते.

या अवनतीचे आणखी कारण असे की, नवीन प्रदेश जिंकायचे, लुटायचे व त्यावर तुंबडी भरायची असे वळण लागले होते. उद्योगात पैसे गुंतवावेत व त्यातून संपत्ती निर्माण करावी, हा धडा ते शिकलेच नाहीत. जेव्हा नवीन देश जिंकण्याचे सामर्थ्य अंगी उरले नाही तेव्हा त्यांनी स्वतःच्या प्रजेलाच लुबाडण्याचा उपक्रम केला. कोणालाही वित्ताची वा जीविताची शाश्वती राहिली नाही. अशाही स्थितीत हे साम्राज्य पहिल्या महायुद्धापर्यंत टिकले याचे कारण त्या प्रशासनाची अकार्यक्षमता व भ्रष्टाचार आणि समर्थ पाश्चात्य देशांनी त्या साम्राज्याला आळीपाळीने दिलेले संरक्षण हे आहे.

आ) अठराव्या शतकाच्या अखेरीला ईजिप्तमध्ये तुर्की साम्राज्याच्या वतीने मामेलुक नावाची भावकी राज्य करीत होती. १७९८ साली नेपोलियनने ईजिप्तवर स्वारी करून मामेलुकांचा पराभव केला. नेपोलियनच्या पाठोपाठ इंग्रज आले. त्यांनी असे भासवले होते की, आपण तुर्कांची बाजू घेऊन त्यांचा अंमल ईजिप्तवर बसवण्यासाठी आलो आहोत. त्यांनी बरोबर तुर्कांची फौज आणली होती. त्या फौजेतील एका तुकडीचा मुख्य महम्मद अली म्हणून होता. या महम्मद अलीनेच ईजिप्तची सत्ता बळकावली. तुर्कांनी आपल्या वतीने त्यालाच सुभेदार करून आपली नामुष्की गोजिरी करून घेतली. इथून ईजिप्तच्या आधुनिक कालखंडाला सुरुवात झाली, असे म्हटले पाहिजे.

महम्मद अलीने राज्याला सुरुवात केली तेव्हा ईजिप्तमधील कारागिरीची इतकी अवनत अवस्था झाली होती की, तेथील सुतारांना अगर पाथरवटांना चाके तयार करता येत नव्हती. तथापि महम्मद अली इरेचा माणूस होता. त्याला काही राजकीय व सैनिकी महत्त्वाकांक्षा होत्या. त्यासाठी पैसा लागतो व ईजिप्त समृद्ध झाल्याखेरीज हा पैसा मिळाला नसता. म्हणून त्याने शेती, कारखानदारी, तंत्रज्ञान, शिक्षण अशा सर्व क्षेत्रात आधुनिकता आणण्याची खटपट केली. त्यासाठी त्याने मुख्यत: फ्रान्समधून तरबेज माणसे आयात केली. या तज्ज्ञांपैकी कित्येकांना ख्रिस्ती धर्म सोडून मुसलमान धर्म पत्करला.

आणवलेल्या फ्रेंच वस्तादांपैकी एक लुई आलेक्सी युमेल नावाचा मनुष्य कपाशीच्या पिकाचा जाणकार होता. याने फ्रान्समधून एक कापसाची जात आणली व तिची ईजिप्तमध्ये लागवड केली. या कापसाचा धागा लांब, तलम आणि तरीही चिवट असे. त्यामुळे यांत्रिक सूत-कताईला व विणकामाला तो टिकत असे. या कापसाने ईजिप्तचे भाग्यच फळफळले. १८२४ साली एक कोटी दहा लाख किलो कापूस निर्यात झाला तर १८४५ साली एक कोटी पंचावन्न लाख किलो! महम्मद अलीने कापसाची एकाधिकार खरेदी आणि एकाधिकार निर्यात सुरू केली. त्यामुळे ईजिप्तचा खजिना भरून वाहू लागला. त्यातला पुष्कळसा पैसा लष्करावर व सुवेझ कालव्यावर खर्च झाला. ईजिप्तच्या वस्त्रोद्योगाने झपाट्याने प्रगती केली. १८३४ साली ईजिप्तमध्ये चार लाख यांत्रिकी चात्या फिरत होत्या. जगात या उद्योगात जपानचा ९वा क्रमांक लागत होता. पण ईजिप्तचे कापड जाडेभरडे निघे.

तथापि हा विकासाचा प्रयोग फसला. स्वबळावर सतत उत्पादनवाढ करणारी अर्थव्यवस्था महम्मद अलीला निर्माण करता आली नाही. एक विचारप्रवाह असा आहे की, पाश्चात्यांनी कट करून हा प्रयोग हाणून पाडला. १८३८ साली इंग्लंडने ईजिप्तला परकी मालावरचा आयातकर काढायला लावला. त्यामुळे ईजिप्तमधील नव्याने उदयाला येणारे उद्योग खुरटून गेले. दुसरा विचारप्रवाह असे सांगतो की, ईजिप्तचा हा सारा खटाटोप वाया जाणार, हे ठरलेलेच होते. जोपर्यंत सरकार पैसे पुरवीत होते, तोपर्यंत हे कारखाने भरभराटीत होते. खुला बाजार, त्या बाजारातील स्पर्धा, व्यवहार यांना ईजिप्तच्या अर्थव्यवस्थेत स्थान नव्हते. स्वदेशी अभियंते, कसबी कारागीर, व्यवस्थापक यापैकी काहीही ईजिप्तजवळ नव्हते. सारे काही परदेशातून आणावे लागत होते.

लँडेस यांचे स्वत:चे मत असे आहे की, ईजिप्तमधील सामाजिक व सांस्कृतिक रचनाच औद्योगीकरणाला अनुकूल नव्हती. ईजिप्तमध्ये व्यापाऱ्यांचा व कारखानदारांचा वर्ग नव्हता. या क्षेत्रात काम करणारे जे कोणी होते ते ज्यू, ग्रीक, कॉप्टिक अशा वंशांचे बाहेरून आलेले अल्पसंख्यांक लोक होते. त्यांचा ह्या प्रयोगातील सहभाग अंगचोरपणाचा होता. जे स्थानिक कसबी कामगार होते. त्यांची कुवत ऊर्जायंत्रे वापरावीत, इतकी नव्हती. ईजिप्तजवळ नवीन यंत्रांसाठी लागणारे इंधन नव्हते. लाकूड नव्हते, कोळसा नव्हता. नवीन कारखाने चालविण्याची हातोटी असणारे व्यवस्थापक नव्हते. बरे, हे कारखाने चालवण्यास मजूर तरी कोठून आणणार? महम्मद अलीने सुरुवातीला काही गुलाम धरून आणले. पण कारखान्यातील वागणूक इतकी भीषण होती की, बहुतेक जण मरून गेले. नंतर देशी मजुरांना कामाला लावले. पण ही वेठबिगार त्यांना सहन होईना. काही जण पळून गेले, काही जणांनी स्वत:ला पंगू करून घेतले, कित्येकांनी कारखान्याची मोडतोड केली. यंत्रे चालेनाशी झाली. नवीन यंत्रे किंवा सुट्टे भाग आणावयास पैसा नाही. एक यंत्र खोलून त्यातील सुटे भाग दुसऱ्या यंत्रात वापरायचे, अशी पाळी आली. ईजिप्तचा समाज औद्योगिकीकरण पेलण्याइतका प्रौढ झाला नव्हता, असे म्हणणे भाग आहे. ईजिप्तमधील उद्योग आयात-करांचे संरक्षण नव्हते म्हणून बुडाले. हे संपूर्ण सत्य नाही. जपानी धंद्यांनाही हे संरक्षण कवच नव्हते.

पश्चिम आशियातील इतर मुसलमानी राष्ट्रांची हकीकत यापेक्षा निराळी नाही. जेथे पेट्रोल आहे तेथे त्याची निर्यात करून त्या देशातील सत्ताधारी चैन करताना आढळतात. पण त्यामुळे तो देश आर्थिक विकासाच्या मार्गावर आहेत, असे म्हणता येत नाही. उद्योगासाठी ज्या पायाभूत सुविधा लागतात त्या म्हणजे सुशिक्षित, उद्योगी, नवे तंत्रज्ञान स्वीकारायला उत्सुक असा समाज. त्याचीच उणीव या सर्व देशातून आहे.

### उपसंहार

अ) आर्थिक विकासाच्या दृष्टिकोणातून पाहता दुसऱ्या महायुद्धानंतर जगातील राष्ट्रांचे अनेक गट झाले आणि प्रत्येक गटाच्या वाट्याला वेगवेगळी परिस्थिती आली. अमेरिका (युनायटेड स्टेट्स) व पश्चिम युरोपातील इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी इ. राष्ट्रे व आशियातील जपान यांनी अपूर्व अशी आर्थिक प्रगती साधली. दुसरा गट दक्षिण अमेरिकेतील राष्ट्रांचा. हे

सर्व देश अमेरिका व तिच्या आधिपत्याखालील जागतिक बँक व आंतरराष्ट्रीय नाणे निधी अशा संस्था यांच्या कर्जाच्या जोखडा-खाली असून त्यांच्या अर्थव्यवस्था मोडकळीला आल्या आहेत.

तिसरा गट पूर्व आशियातील देशांचा. यात दक्षिण कोरिया, हाँगकाँग, तैवान, सिंगापूर, मलेशिया, थायलंड व इंडोनेशिया इतक्या देशांचा समावेश होतो. या देशात मुख्यतः चिनी वंशाचे लोक आहेत. हे लोक कसबी, कष्टाळू आणि कमी वेतनावर काम करण्याची तयारी असणारे आहेत. ज्या देशांची चलने फार महाग आहेत अशा अमेरिका, जपान इ. देशांनी पूर्व आशियातील उद्योजकांच्या भागीदारीत तेथे कारखाने काढले. परकी भांडवलाची इतक्या मोठ्या प्रमाणावर गुंतवणूक या पूर्वी कधीच झाली नव्हती. जपानी स्पर्धेला तोंड देता यावे म्हणून अमेरिकन मोटार कंपन्यांनी दक्षिण कोरियात कारखाने काढले; स्विस व जपानी घड्याळ कंपन्यांनी हाँगकाँगकडून व मलेशियाकडून घड्याळे करवून घेतली; जपानी, युरोपीय व अमेरिकन कंपन्यांनी इलेक्ट्रॉनिक्स व फोटोग्राफी हे आपले धंदे सिंगापुरात नेले. आता स्थिती अशी आली आहे की, दक्षिण कोरियातील कंपन्या इंग्लंडमध्ये मोटारींचे कारखाने काढत आहेत, हाँगकाँगचे उद्योगपती चीनमध्ये उद्योग नेत आहेत तर सिंगापूरच्या टेलीफोन कंपन्या फिलीपाईन्सकडून टेलीफोन बनवून घेत आहेत.

आशिया व आफ्रिका यातील देशांची प्रगती अडखळत चालली आहे. त्यांचे एक पाऊल पुढे पडले तर नंतर ते दोन पावले मागे जातात. वास्तविक यापैकी काही देशांकडे पेट्रोलचे प्रचंड साठे आहेत. काही देशांकडे स्वस्त व कसबी मजूरवर्ग आहे. बऱ्याच देशांकडे भरपूर निसर्ग-संपत्ती आहे. पण गैरव्यवस्थापन, उधळपट्टी, भ्रष्टाचार, सततची कर्जदारी व दिवाळखोरी, आपला आवाका लक्षात न घेता हाती घेतलेले विकास-प्रकल्प यामुळे या देशातील आर्थिक विकास कच्चा आणि तकलादू राहातो. चांगली आर्थिक धोरणे कोणती? आपल्या चलनाच्या विनिमयाचा दर आपल्या परिस्थितीला अनुरूप आणि आपल्या मालाला जगाच्या बाजारात स्पर्धा करता येईल, असा ठेवला पाहिजे. अर्थ-संकल्पात तूट ठेवता कामा नये. व्यापार खुला ठेवला पाहिजे व बाजारपेठ ही सर्वांना न्याय देते, हे मानले पाहिजे.

शेवटचा गट म्हणजे परवा-परवा पर्यंत साम्यवादी असणाऱ्या देशांचा. आर्थिक दृष्ट्या सर्वात जास्त मार खाल्लेले देश हे आहेत. जवळ जवळ ७५ वर्षे पूर्णपणे सरकारी नियंत्रणाखाली असणाऱ्या या अर्थव्यवस्थांचे लक्षण असे होते की, त्या अर्थव्यवस्थांविषयी या देशांच्या लढाया व प्रत्यक्षात त्या अर्थव्यवस्थांपासून मिळणारी फळे यात महदंतर होते. केवळ तर्कशास्त्राचा आधार घेतला, तर साम्यवादी विचारसरणीत बोट शिरकावयाला अवकाश नव्हता. तज्ज्ञांनी योजना आखाव्यात, उत्साही कार्यकर्त्यांनी त्या अंमलात आणव्यात. तंत्रज्ञानाचा उपयोग करून निसर्गाला आपल्या उपयोगासाठी राबवून घ्यावे. फायदा सर्वांनाच मिळेल. सुरुवातीला प्रत्येक नागरिकाला त्याच्या योग्यतेप्रमाणे व अखेरीला प्रत्येक नागरिकाला त्याच्या गरजेप्रमाणे उत्पादनाचा वाटा मिळेल. ज्यांना भांडवलशाहीचा काही कारणाने दुस्वास वाटत होता, त्यांना या इंद्रजालाचे साहजिक आकर्षण वाटले. भांडवलदारी देशातील विचारवंत, उदारमतवादी व पुरोगामी यांनी या साम्यवादी अर्थव्यवस्थांचे गोडवे कंठरवाने गायले आणि जगातील दरिद्री राष्ट्रातील पुढाऱ्यांना तर साम्यवादी कार्यक्रम हा स्वर्गाचा सोपान आहे, असेच वाटू लागले. पण या सरकारी नियंत्रणाखालील अर्थव्यवस्था अतिशय दुबळ्या व गैरव्यवस्थापनाने गांजलेल्या होत्या. हे देश उत्पादनाची खोटी आकडेवारी देत, झालेले उत्पादन खालच्या दर्जाचे व स्पर्धाळू बाजारपेठेत न खपणारे असे. त्यामुळे या अर्थव्यवस्था व त्यांचे नियंत्रण करणाऱ्या राजवटी या कोलमडून पडल्या.

आ) गेल्या सहस्रकातील इतिहासाचा हा एक धावता आढावा आपण घेतला. पण नवीन विचारसरणी मानणारे इतिहासकार या मांडणीलाच आक्षेप घेतात. ते म्हणतात की, इतिहासाचे हे निवेदन पाश्चात्यांना केंद्रीभूत धरून आणि त्यांच्या दृष्टिबिंदूला लगटून केलेले असल्याने हा इतिहास म्हणजे पाश्चात्यांचे एक वैचारिक आक्रमणच आहे. इतिहासकाराने निरनिराळ्या संस्कृती या पूर्ण स्वतंत्र आहेत व त्यांचे तुलनात्मक मूल्यमापन करता येत नाही, हे मान्यकरून इतिहास लिहिला पाहिजे. तो मानवतेचा इतिहास झाला पाहिजे व युरोपची त्या इतिहासातील भूमिका केवळ अनुषंगिक मानली पाहिजे. युरोपातील दृष्टिकोन न स्वीकारता ते कर्तेपण युरोपचा फैलाव जगभर झाला व इतर संस्कृतींचा फैलाव तसा झाला नाही या आकस्मिकतेतुन निर्माण झाले, असा खुलासा केला पाहिजे. अखेर जगाचा इतिहास पाश्चात्य संस्कृतीला काही आकस्मिक कारणांमुळे लाभलेल्या यशाचा इतिहास आहे तसाच तो तितक्याच आकस्मिक कारणांमुळे इतर संस्कृतींना लाभलेल्या अपयशाचाही

आहे. त्यामुळे प्रत्येक संस्कृतीचे जगाच्या इतिहासाला झालेले साहाय्य सारखेच मानले पाहिजे.

पण लांडेस यांचे मत आहे की, ही विचारसरणी स्वीकारणे म्हणजे विवेकाला रामराम ठोकणेच होय.

शिवाय ते वस्तुस्थितीला धरूनही होणार नाही. तुम्हाला अमुक हकीकत आवडली नाही, म्हणून ती तशी घडलीच नाही, असा आग्रह कसा धरता येईल? विज्ञान, तंत्रज्ञान, इतर वैचारिक व शास्त्रीय क्षेत्रे यात युरोपने आघाडी घेतली, हे कधीच नाकारता येणार नाही; आणि अशी आघाडी युरोपने घेतली असेल तर युरोपला ते का साधले याचा विचार झालाच पाहिजे. आज आपण जे आहोत ते का आहोत हे व आपण उद्या कसे असू हे, अशा विचारातूनच कळू शकते.

संस्कृती व समृद्धी (समाधान नव्हे) यांचा निकटचा संबंध आहे. चिनी लोक चीनमध्ये संपत्ती निर्माण करू शकत नाहीत पण मलेशियात किंवा थायलंडमध्ये जाऊन श्रीमंत होतात. भारतीय लोक आफ्रिकेत किंवा अमेरिकेत गेले की, उद्योगशीलता दाखवतात पण खुद्द भारतात ती कामी येत नाही. या उदाहरणावरून हे दिसून येते की, त्या देशातील संस्कृती उद्योगप्रवण व्यक्तींच्या मार्गात अडथळा आणतात. संस्कृतींच्या गुणदोषांची चर्चा करणे विद्वत्तेच्या क्षेत्रात शिष्टपणाचे समजले जात नाही. त्याला वंशवादाचा, पारंपरिकतेचा आणि अपरिवर्तनीयतेचा वास येतो. परंतु, हा सोवळेपणा उपयोगाचा नाही. संस्कृती बदलू शकतात व त्यांच्यात जाणीवपूर्वक बदल घडवून आणता येतो. त्यामुळे संस्कृतीच्या अर्थव्यवहाराच्या दृष्टीने बरे-वाईटपणाचा विचार केल्याने कुणाचा मानभंग होण्याचे किंवा अहंकार दुखावण्याचे कारण नाही.

संस्कृतीतील मूल्यांचा व जीवनदृष्टीचा अर्थकारणावर परिणाम होतो त्याचप्रमाणे अर्थकारणामुळे संस्कृतीतही बदल घडून येतात. थायलंडमधील तरूण व होतकरू मुले पूर्वी बौद्धविहारात वर्षानुवर्षे अध्ययन करीत. पारंपरिक अर्थव्यवहार व कार्यपद्धती झोपाळलेल्या असल्याने हा दीर्घ ब्रह्मचर्याश्रम त्यांना अनुरूप असाच होता. पण आता थायलंडमधील अर्थकारणाला गती आली आहे. आता तरुण मुले काही आठवड्यात धर्मकृत्ये शिकतात व लगेच व्यवहाराकडे वळतात. कधी कधी अर्थव्यवहाराचे कायदे पाळायला जीवनदृष्टी नकार देते. रशियात साम्यवादी राजवटीने बाजारपेठ व नफा यांचा तिरस्कार करण्याची शिकवण समाजाला दिली. उद्योगप्रवणता मारली गेली. आता साम्यवादी राजवट संपली, तरी लोकांना खुल्या बाजारपेठेविषयी विश्वास वाटत नाही. धंदा करण्यापेक्षा शाश्वती देणारी सरकारी नोकरीच बरी, असा लोकांचा कल दिसतो.

इ) सहस्रकाच्या सुरुवातील जगात लहान-मोठी साम्राज्ये व राज्ये होती. त्यांची आर्थिक व सामरिक शक्ती जवळपास सारखीच होती. आता जगात शेकडो राष्ट्र-राज्ये (नेशन-स्टेट्स) झाली असून त्यांच्या आर्थिक व सामाजिक सामर्थ्यात प्रचंड तफावत आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर काही प्रमाणात व सहस्रकात शेवटच्या दशकात जागतिकीकरणावर जोर दिला जात आहे. त्यामुळे काही विचारवंतांना असे वाटते की, जगाची एकच एक अर्थव्यवस्था निर्माण होईल. राष्ट्रांची शासने स्वतंत्र राहिली तरी त्यांचा अर्थव्यवस्थेतील हस्तक्षेप नाहीसा होईल. खुल्या बाजारपेठेचे फायदे सर्वांनाच मिळून श्रीमंत देश व गरीब देश यांच्यातील अंतर कमी होईल व अखेर नाहीसेही होईल.

तथापि असे होईलच याची खात्री वाटत नाही. एक तर आज एकादा देश श्रीमंतीच्या मार्गावर आहे म्हणून तो सतत तशीच प्रगती करीत राहील असे नाही. लढाई, बंडाळ्या, नैसर्गिक आपत्ती, गैरकारभार, गुन्हेगारी व लोकांची आळसाकडे असणारी प्रवृत्ती अशा अनेक कारणांनी प्रगतीची वाट खुंटलेली आढळून येते. दुसरे, शासनाचे अर्थव्यवहारावरील नियंत्रण संपुष्टात येऊ शकेल किंवा तसे होणे भरभराटीला उपकारकच असेल असे सांगता येत नाही. आज प्रत्येक सरकार अर्थव्यवस्थेत हस्तक्षेप करतच असते. सत्ता व समृद्धी, समता व व्यक्तिगत कार्यक्षमतेतील तफावत, अशा परस्परविरोधी गोष्टींचा मेळ सरकारला घालायचा असतो. त्यामुळे शासनाने अर्थव्यवहारात ढवळाढवळ करावी की नाही याचा सरळसोट निर्णय करणे अवघड आहे. आद्य अर्थशास्त्रज्ञ ॲडॅम स्मिथ हा अर्थकारणापासून शासनाने दूर राहावे अशा मताचा होता. पण संरक्षण व पोलीस यांसारखी अर्थव्यवहारावर परिणाम करणारी खाती शासनाकडे असावीत, असे त्याचेही मत होते. तुर्कस्थानात पूर्वी अग्निशामक-दले खाजगी मालकीची होती. कुठे आग लागली की, बंबवाले येत व घरमालकाशी "आग विझवण्याचे पैसे किती देता?" अशी हुज्जत घालीत. त्या घासाघिशीत आग आणखीच भडके व आळीच्या आळी भस्मसात होई. तिसरे, असेही अनुभवाला येते आहे की, शासन हे उद्योगधंद्यांची बटीक बनत आहे. खाजगी धंद्यातील पैशाचा पूर पाहून सरकारी नोकर लोभावतात आणि



अनुक्रमणिका

भ्रष्टाचार वाढतो. राष्ट्रांचे अध्यक्ष व पंतप्रधान परदेशी गेल्यावर स्वदेशातील खाजगी धंद्यांचे अडते म्हणून वावरतात.

देशा-देशातील विषमता कमी होऊ शकते असे मानणाऱ्या अर्थवेत्त्यांचा भर 'तुलनात्मक फायदा' (कंपेरेटिव्ह ॲडव्हान्टेज) नावाच्या तत्त्वावर असतो. या तत्त्वाचा व्यावहारिक अर्थ असा की, एखाद्या देशाला गव्हाचे उत्पादन व विक्री करून जास्तीत जास्त फायदा होत असेल तर त्या देशाने दुसरी उत्पादने करण्याच्या मागे लागू नये. बाकी लागणाऱ्या वस्तू आयात कराव्यात. कॅरिबियन बेटांनी फक्त साखरेच्या उत्पादनावर भर दिला; बाकी वस्तू, अगदी अन्नधान्य देखील आयात केले व उत्कर्ष साधला. पण यात दोन अडचणी आहेत. उद्या गव्हाच्या उत्पादनातून व विक्रीतून होणारा फायदा कमी होत आहे असे आढळले तर त्या देशाला दुसऱ्या उत्पादनाकडे झटक्यात वळता येईल का? शिवाय, 'तुलनात्मक फायदा' सर्व वस्तूंच्या बाबतीत सारखीच किफायत देतो, असे नाही. काही वस्तू मुळातच अधिक संपत्ती देणाऱ्या असतात.

पुढचे असे की, वस्तूंची आयात-निर्यात खुली ठेवली तरी त्यामुळे रोजगाराची आयात-निर्यात खुली होईलच असे नाही. या दोन्ही प्रकारच्या आयात-निर्यातीचे होणारे परिणाम वेगवेगळे असतात. बाजारपेठ खुली असावी व तेथल्या परिस्थितीवर अवलंबून निर्णय घ्यावेत हे ठीक असले, तरी समाज तसे वागतातच असे नाही. संस्कृतीतील फरक इथेच दिसतो. यामुळे असे म्हणावे लागते की, अर्थव्यवहार नियंत्रण-मुक्त ठेवल्याने देशादेशातील विषमता जाईल, असे नाही.

ई) अशा ह्या जगात श्रीमंत व गरीब देशांनी कसे वागावे? श्रीमंतांनी आपली श्रीमंती कशी टिकवावी व गरिबांनी पैसा कसा मिळवावा? श्रीमंतांनी गरिबांना मदत करावी का व केल्यास कशा प्रकारे करावी?

श्रीमंतांनी आपली समृद्धी कायम राखली पाहिजे. त्यासाठी त्यांनी आपली ज्ञानोपासना चालू राखली पाहिजे, संशोधनाच्या आघाडीवर राहिले पाहिजे. ज्ञानाच्या नवीन शाखांना जन्म द्यावा व त्यांची जोपासना करावी. आपल्या पारंगततेची नवी क्षेत्रे निर्माण करावीत. आपल्या क्षमता व ज्ञान यांची वृद्धी करावी. असे केल्याने त्यांचा पुढावा कायम राहील. त्यांच्या समाजातील मागास लोकांना नवी कौशल्ये हस्तगत करून पैसा मिळविता येईल. नवीन रोजगार निर्माण होतील.

श्रीमंत देश आता अशा अढळपदावर पोचल्यासारखे झाले आहेत की, त्यांना गरीब देशांविषयी आस्था वाटेल असे वाटत नाही. पण शहाणपणा म्हणून नव्हे तर नैतिक कर्तव्य म्हणून त्यांनी गरीब देशांना मदत केली पाहिजे. आता ही मदत कशी करावी? दान द्यावे की कर्ज द्यावे? फायद्याची अपेक्षा ठेवावी का? या प्रश्नांची उत्तरे सोपी नाहीत. ती त्या त्या परिस्थितीवर अवलंबून राहतील.

दरिद्री देशांनी कसे वागावे? बाहेरून औषधांचा मारा करून गरिबी हटत नाही. आंतरिक तळमळीने प्रयत्न व्हावे लागतात. परकी मदतीचा उपयोग होतो पण जर त्यामुळे देशाची कष्ट करण्याची इच्छा कमी झाली तर परकी मदत घातक ठरते. कष्ट, काटकसर, प्रामाणिकपणा, सहनशीलता, चिकाटी या गुणांना पर्याय नाही. गरीब समाजांना हा उपदेश शाळकरी छापाचा व मानभावीपणाचाही वाटेल. पण शहाणपण जुनाट किंवा गुळगुळीत होत नसते. गरीब देशातील बहुतेकांनाही आता सुखासीनता भावू लागली आहे. ज्याने आयुष्यातील आनंद वाढेल असे व इतकेच काम करावे, असे या लोकांना वाटते. त्यात चूक काही नाही; पण अशा वृत्तीतून उत्पादन वाढत नाही. तुम्हाला उत्पादन वाढवावयाचे असेल तर तुम्ही काम करण्यासाठी जगा व तसे जगताना जो आनंद वाट्याला येईल, त्यात समाधान माना.

हे सांगायला सोपे पण आचरण्याला अवघड असे व्रत आहे. जगात फार थोडी माणसे अशी असतात की, ज्यांना काम करण्यासाठी जगावे असे वाटते. पण हे थोडे लोक आपल्या गटात नव्यांना घेण्यासाठी फार उत्सुक असतात. आशावादी असणे हेही महत्त्वाचे आहे. आशावादी लोक यशस्वी होतात याचे कारण आशावाद बरोबरच असतो हे नसून आशावादामुळे स्वतःला सुधारून घेणे, चुका दुरूस्त करणे व यशाची वाटचाल चालू ठेवणे अशी उमेद मिळते. अखेरचा धडा हा की, प्रयत्न करीत राहा. चमत्कारांची अपेक्षा करू नका. परिपूर्णतेची अपेक्षा करू नका. जगबुडी होत नसते तशी स्वप्नपूर्तीही होत नसते. डोळस श्रद्धा आपण जोपासली पाहिजे. कडवेपणा नाकारला पाहिजे. आपली उद्दिष्टे पुनः पुनः तपासली पाहिजेत व त्यांच्या पूर्तीसाठी योग्य साधने निवडली पाहिजेत.

⌘⌘

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## प्रतिसाद

'*प्रारंभ*च्या निमित्ताने' हा वसंत पळशीकर यांचा परीक्षणवजा लेख (*नवभारत*, सप्टेंबर २००३, पृ. ३२-४२) वाचला. इतिहास आणि कादंबरी यासंबंधीचे त्यांचे विवेचन वाचून हे पत्र लिहावेसे वाटले.

स्थल, काल आणि व्यक्ती यांची अचूक सांगड पडली की, ऐतिहासिक घटिताशी आपण पोचतो, इतिहासाचा हा गाभा असतो. या घटिताचा पूर्वोत्तर कालाशी संबंध जोडला जातो. या गोष्टींना साक्षीपुराव्याचा आधार असतो. इतिहासकार ऐतिहासिक घटनांचा अन्वयार्थही लावत असतो, हा मात्र इतिहासकाराच्या दृष्टिकोनावर अवलंबून असतो. त्याचे विवेचन प्रतिभाशालीही असू शकते. ते कसेही असले तरी मूळ घटिताइतके निर्विवादपणे ते मान्य होत नाही. पण साक्षीपुराव्याच्या चौकटीत साधार अंतरंगदर्शनाला अर्थातच वाव असतो आणि हे सारे निवेदनात्मक असते.

कादंबरी ही कथनात्मक कल्पित वस्तू असते. सत्य घटनेवर ती आधारित असली तरी कादंबरीकाराचे अमर्याद स्वातंत्र्य आपण मान्य करतो. त्याची ती नवनिर्मिती असते. ती बाहेरच्या कुठल्याच घटनेचा बळकट पुरावा नसते आणि बाहेरच्या कुठल्याच पुराव्याची तिला गरज नसते. ती बरी-वाईट असली तरी स्वतंत्र असते. अशा कादंबरीचे जे अनेक उपप्रकार आहेत. त्यात ऐतिहासिक कादंबरी हा एक आहे. हा प्रकार जणु असे सांगत असतो की, "मी कादंबरी असल्याने स्वतंत्र आहे, पण इतिहासाच्या गाभ्याशी मी बांधून घेणार आहे. माझी आतली गरज म्हणून हे बंधन मी स्वीकारत आहे. स्थल, काल आणि व्यक्तीची सांगड घालण्याच्या कलात्मक ओढीतूनच मी अशी बद्ध झाले आहे. अन्यथा माझं कलात्मक ईप्सीत साध्य होणार नाही. एका ऐतिहासिक घटनेचं विशिष्ट अन्वयार्थात्म प्रतीतिपूर्ण चित्र मी काढलंय की नाही ते तुम्ही पहा."

याचा अर्थ साधार प्रतिपादन हे इतिहासाचं रूप असतं तर प्रतीतिपूर्ण विशाल जीवनदर्शन हे कादंबरीचं. इतिहासातील अन्वयार्थ गाभ्याइतका वस्तुनिष्ठ नसतो. त्याप्रमाणे कादंबरीतील जीवनदर्शक अन्वयार्थ अपेक्षेइतका परिपूर्ण नसू शकतो. विवाद्य अन्वयार्थानं इतिहासाच्या इतिहासापणाला बाधा येत नसेल तर अपूर्ण जीवनदर्शनानं कादंबरीच्या कादंबरीत्वाला बाधा का यावी? कादंबरी, 'रोचक कहाणी' का व्हावी?

*प्रारंभ*तील रोचक कहाणीला कादंबरीचा घाट येण्यासाठी पळशीकरांनी काही विधायक सूचना केल्या आहेत. 'दोनतीन इंग्रजी पात्रे निर्माण करायला हवी होती', 'शेणबी, पाठारे प्रभू, पारशी यांच्यामधून दोनतीन काल्पनिक पात्रांची निर्मिती करण्याची जरूरी होती'....'कोळी, भंडारी, आग्री...जमातींची पात्र निर्मिती केली असली तर मोलाचे ठरले असते.' समजा लेखकाने अशी आणखी सात-आठ काल्पनिक पात्रे निर्मिली असती तर मुंबईच्या समग्र दर्शनाला परिपूर्णता आली असती का? सी.के.पी., सोमवंशी क्षत्रिय अशा मातबर जाती उरल्याच असत्या.

*प्रारंभ* या रोचक कहाणीला कादंबरीचे विशाल परिमाण लाभण्यासाठी लेखकानं काय करायला हवं होतं यासंबंधी काही पर्यायही पळशीकरांनी सुचविले आहेत आणि ते पर्याय कल्पकतापूर्ण आहेत, कादंबरीकारापुढेही असे काही पर्याय असतात. त्यातील एक स्वीकारला की बाकीचे सुटतात. जगन्नाथ शंकरशेठ यांना मध्यवर्ती कल्पून मुंबईच्या आधुनिकीकरणाची गाथा शक्यतो ऐतिहासिक घटना आणि व्यक्ती यांच्या सहाय्याने रचायची हा पर्याय निवडून कादंबरीलेखन केले, समाजप्रबोधनाचा एक मार्ग सुचविला असे *प्रारंभ* मध्ये दिसते.... नानांचे व्यक्तिमत्त्व, त्यांचा मार्ग, त्यासंबंधीचे वाद याबाबत पळशीकर काहीच स्पष्टपणे म्हणत नाहीत.

**रवीन्द्र घवी**
पणजी, गोवा

'*प्रारंभ*च्या निमित्ताने' या परीक्षणवजा लेखासंबंधी रवींद्र घवी यांचे पत्र वाचले. एखादे ललित लेखन 'कादंबरी' म्हणवून घेण्यास पात्र कधी ठरते? म्हणजेच, कादंबरीचे कादंबरीपण कशात असते? ऐतिहासिक कादंबरी या उपप्रकाराच्या संदर्भातला प्रश्न असा की, कादंबरीही ठरावी आणि ती ऐतिहासिकही ठरावी यासाठी कादंबरीकाराला त्याच्या 'स्वातंत्र्या'वर कोणत्या मर्यादा






स्वीकारणे अत्यावश्यक असते? कादंबरी ही कादंबरीकाराची 'नवनिर्मिती' असते ती कोणत्या अर्थाने?

ऐतिहासिक व्यक्ती पात्रे म्हणून उभी न करता ऐतिहासिक कादंबरीचे लेखन शक्य आहे. इतिहासातल्या एका कालखंडाला वा एखाद्या युगप्रवर्तक घटनेला जिवंत व्यक्तित्व प्राप्त करून देणारी अशी नवनिर्मिती शक्य आहे.

मुंबई नगरीच्या जडणघडणीचा जो कालखंड गंगाधर गाडगीळांनी चित्रणासाठी निवडला तो अत्यंत रोमहर्षक कालखंड आहे. मुंबईमध्ये ज्या अनेकानेक घडामोडी या काळात घडल्या, त्या घडविण्यामध्ये ज्या नामवंत व्यक्तींचा हात होता त्यांमधील निवडक घडामोडी व त्यांमध्ये सहभागी असलेल्या मुख्य व्यक्ती यांचे बाहेरून चित्रण व कथन केले तरी या कालखंडाची रोमहर्षकता वाचकांपर्यंत पोचेलच पोचेल असा हा कालखंड आहे. घटना व व्यक्ती यांची निवड करून कुशलतेने व कसोशीने त्यांच्या चित्रणामधून व मांडणीमधून एक 'कलात्मक घाट' निर्माण करण्यात गंगाधर गाडगीळ यशस्वी झाले आहेत. पण कादंबरी-प्रकारातील लेखनाच्या संदर्भात 'कलात्मक घाटा'ची जातकुळी व आशय मूलतः वेगळाच असतो व असायला हवा. 'माणसं, त्यांची मने, त्यांच्यातील नाती व व्यवहार, माणसाचे अंतरंग यांविषयीच्या सत्याचे प्रत्ययकारी दर्शन' या स्वरूपाचा हा 'कलात्मक घाट' असतो व असायला हवा. बाहेरून केलेल्या चित्रण-कथन व मांडणीमधून हे साधत नाही. कादंबरीकाराला पात्रांच्या निर्मितीचे, स्थल-कालाच्या निवडीचे 'अमर्याद' स्वातंत्र्य असते; पण एकदा त्याने या प्रकारच्या निवडी केल्यावर ती पात्रे त्या विशिष्ट स्थलकालात स्वतःचे जीवन काही एका आंतरिक अनिवार्यतेने जगतात, स्व-तंत्रपणे जगतात असे घडावे लागते. ही एक किमयाच असते, पण कादंबरीत ती घडून येते.

या अर्थाने मला *प्रारंभ*मध्ये पात्रे आढळली नाहीत, आणि म्हणून या लेखनाला कादंबरीपण लाभत नाही.

*प्रारंभ*चा विषय 'मुंबई नगरी' हा आहे, की 'जगन्नाथ शंकरशेट' हा? नाना शंकरशेटांना मध्यवर्ती ठेवून एका कालखंडातील मुंबई नगरीची वाटचाल चित्रित करावयाची हे गाडगीळांचे सीमित उद्दिष्ट कधीच नव्हते. झाले आहे ते असे की, ना जगन्नाथ शंकरशेट हे कादंबरीचे नायक बनतात, ना मुंबई नगरी. एका विस्तीर्ण इलाख्याच्या राजधानीचा दर्जा प्राप्त झालेली आधुनिक व्यापारी-औद्योगिक नगरी कशी आकाराला आली याचे इतिहासनिष्ट कहाणीच्या स्वरूपातले चित्रण *प्रारंभ*मध्ये येते. अनेक ऐतिहासिक व्यक्तींचे योगदान काय राहिले याचेही चित्रण येते.

'मुंबई नगरी' या नायिकेची ही कादंबरी होऊ शकली असती. यासाठी नामवंत ऐतिहासिक व्यक्तींच्या जोडीला इतरही अनेक पात्रांची निर्मिती करावी ही गरज होती, असे माझे म्हणणे.

*प्रारंभ*च्या निमित्ताने मी काही मुद्दे उपस्थित करू इच्छित होतो. नाना शंकरशेट हा स्वतंत्र व मोठा विषय आहे. रवींद्र घवी यांना ज्या प्रकारची चर्चा अपेक्षित आहे ती करण्यासाठी पुष्कळ अधिक अभ्यासाची आवश्यकता आहे. असो.

**वसंत पळशीकर**








हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका






